मराठवाडा साहित्य परिषद प्रकाशन

# महाराणी व इतर कथा



दिवाकर कृष्ण



मूल्य २ रुपये

प्रकाशक :
रा. ब. माढेकर
अध्यक्ष, मराठवाडा साहित्य परिषद्
इसामियाँ बाजार, हैदराबाद (दक्षिण)

आवृत्ति पहिली
१९५५

मुद्रक :
जयहिंद प्रिंटिंग प्रेस
मालक : संचालक भारत मुद्रक आणि
प्रकाशक लिमिटेड. अे । ८ । ५५८
नारायणगुडा, हैदराबाद द.

# प्रकाशकाचें निवेदन

मराठी साहित्याच्या क्षेत्रांत दिवाकर कृष्णांचा परिचय नाहीं कुणाला ? मराठी लघुकथेला त्यांनीं आपल्या वैशिष्ट्यानें आगळेंच वळण लावलें. त्यांचा हा तिसरा लघुकथा संग्रह प्रसिद्ध करतांना मराठवाडा साहित्य परिषदेला साभिमान आनंद वाटतो.

प्रस्तुत संग्रहांतील प्रत्येक कथा तंत्र आणि मंत्राच्या दृष्टीनें वेगळीच आहे. या कथांत दिवाकर कृष्णांचें वेगळेंच वाङ्मयीन दर्शन वाचकांना घडेल.

दिवाकर कृष्णांनीं प्रस्तुत संग्रह प्रकाशित करण्याचा मान मराठवाडा साहित्य परिषदेस दिला याबद्दल परिषद त्यांची कृतज्ञ आहे. तसेंच इतर अनेकांचें सहकार्य लाभलें त्या सर्वांचे आभार!

— प्रकाशक

श्री

# कांहींसें प्रास्ताविक

ही प्रस्तावना नाहीं. यापूर्वीच्या कोणत्याहि संग्रहाला ती नव्हती. याच वेळीं हा संकेत मोडावा असें कांहीं कारणहि नाहीं.

अलीकडे असें चाललें आहे कीं, कुणीकडून तरी दडपण यावें आणि लिहिलें जावें. अशाच रीतीनें १९५० सालांतील मुंबईच्या संमेलनाच्या कथाशाखेचें अध्यक्षीय भाषण आणि 'महाराष्ट्र परिचयां' तील लघुकथेसंबंधीं मजकूर लिहिला गेला. तोच प्रस्तावनेचा भाग.

अलीकडे लिहिलेल्या कथा या संग्रहांत संकलित आहेत. 'संज्ञा-प्रवाह' आणि 'क्षण पकडून ठेवणें.' इत्यादि प्रकारच्या नव्या मोज-पट्टीच्या नवकथांच्या काळांतील.

आपली कथा नित्य नवी. निकष नवे लावले म्हणून काय झाले? हा विश्वास! उत्तर बरोबर असेल तर कोणत्याहि रीतीनें तें पडताळून तपासून, पारखून पाहिलें म्हणून काय झालें! कलाकृतीकडे रसिकानें सर्व बाजूंनीं निरखून, कसून, बारकाईनेंच पहायचें असतें.

पण अभ्यासकांना सोयीचें जावें म्हणून प्रत्येक कथेच्या निर्मि-तीची पार्श्वभूमि नोंदलेली असावी ही सूचना ग्राह्य. या कथांच्या मागें तसा कांहीं विशेष सांगण्यासारखा इतिहास आहे असेंहि नाहीं.

'महाराणी' ही कथा हैदराबादेंत पोलीस ॲक्शन चालू असतां विटे (जिल्हा दक्षिण सातारा) येथें लिहिली गेली आणि लगेच नव-युगाच्या दिवाळी अंकांत प्रसिद्ध झाली. एका हातीं केंद्रित झालेल्या

अमाप अधिसत्तेचा शेवट काय हा विचार प्रामुख्यानें मनावर होता. त्याच कल्पनेचें एक स्वप्नरंजन, कथानक आणि वातावरण यांच्या कोंदणांत गुंफलें गेलें.

कोणत्याहि कॉलेजांत असूं शकेल असाच विषय 'विनयभंग' या कथेंत आहे. मानवी मनोव्यापारांनीं नेहमींच शास्त्राचा पराभव केलेला आहे. तरुण मनें हा अभ्यासाचा अगदीं रंजक विषय आहे. पण अतिशय अवघड आहे. व्यक्तिचित्रणाच्या अचूक रेखीवपणाच्या पार्श्वभूमीवर मनोनिरीक्षणाच्या रेषा ओढून अंतर्मनाचे व्यापार ओझरतें दाखविले आहेत.

'मांजरीचीं पिलें' ही एक संपूर्ण सत्यकथा आहे. विशिष्ट संस्कारांनीं मनें हळुवार झालीं म्हणजें माणसें जी वागणूक करतील त्यांचें कारणपरंपरा देऊन समर्थन करतां येत नाहीं. मानवी मन हें एक कोडें आहेच. अशा वास्तव चित्रणांत तें आणखी अधिक गूढ होतें.

'चंदा आणि कमोदा' या ऐतिहासिक कथेंतलि व्यक्ती आणि प्रसंग जसेच्या तसे घेतलेले आहेत; पण, या देवदासाची मनोभूमिका मात्र कपोलकल्पित आहे. आजच्या उच्चभ्रू–समाजसंकेताल ती परकी आहे. पण तींतील उदात्तता, निष्ठा, आणि ऐकांतिक अभिमान यामुळें तिचें जीवन कथाविषय झालें आहे. 'अशीच एक सायंकाळ' ही अशीच एक मध्यमवर्गीय स्त्रीमनाची रेखाकृती आहे. मनांतील विचारांचें पिंजण अतर्मनांतील भावांचीं अवगुंठणें दूर करण्यापुरतेंच योजिलें. आहे.

या दोन्ही कथा हैदराबाद नभोवाणीवरून ध्वनिक्षेपित झालेल्या आहेत. आणि नभोवाणीच्या अधिकाऱ्यांनीं उदारपणें त्या या संग्राहांत प्रसिद्ध करण्याला अनुमति दिलेली आहे.

'कैलासाचा निर्माता' या कथेंतील गाभा अनेक वर्षांपूर्वीं वेरूळच्या एका गुरवानें दंतकथा म्हणून मला सांगितला होता. उपलब्ध

ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध होणाऱ्या ऐतिहासिक सत्याला बाध न येतां या कथेचें निवेदन व्हावें हा कटाक्ष पाळायचा होता म्हणून कालावधी लागला. नभोवाणीच्या अधिकाऱ्यांनीं कालमर्यादेंत बांधलें नसतें तर अजूनहि कालावधि लागला असता. हीहि कथा या वर्षीं नभोवाणीवर ध्वनिक्षेपित झाली.

'जगायचंय् मला' ही कथा या संग्रहासाठीं नुकतीच नवीन लिहिली गेली. व्यक्ति, वातावरण, विषय, निवेदनपद्धति, आणि मनोभावना या सर्वांचेंच एक नवीन जग, मराठी कथावाङ्मयांत आणून सोडावें म्हणून ही अशी लिहिली. कितीसें साधलें 'न खलु तद्वाच्यं वधूबंधुभि:'

हा संग्रह प्रसिद्ध होण्याचे सर्व श्रेय मराठवाडा साहित्य परिषदेच्या कार्यकर्त्यांनाच आहे. त्यांनीं उठावणी केली नसती तर कांहींच झालें नसतें.

हैदराबाद

—दिवाकर कृष्ण

| | |
|---|---|
| महाराणी | १ |
| विनय-भंग | १२ |
| मांजरीचीं पिल्लें | २८ |
| चंदा आणि कमोदा | ३७ |
| अशीच एक सायंकाळ | ४४ |
| कैलासाचा निर्माता | ५३ |
| जगायचंय् मला ! | ७० |

# महाराणी

महादेवाचें तें भव्य मंदिर म्हणजे शिल्पकलेची शिकस्तच. राजधानीलगतच्या एका लहानशा टेकडीवर बांधलेलें. उगवत्या सूर्याचीं पहिलीं किरणें महाद्वारांतून, सभामंडपांतून आणि गाभाऱ्याच्या सोनेरी दारांतून आंत शिरून शिवलिंगावर पडावींत अशीच त्याची रचना.

सम्राटांनीं तें देवालय खास आपल्या अतुल वैभवाच्या प्रदर्शनासाठी बांधविलेलें. त्यांतील पाचेच्या सुंदर शिवलिंगाचें दर्शन घडणें सम्राटांच्या महाप्रसादाचें चिन्हच. सभोंवतीं खास वाढविलेली उद्यानराजी. शेजारीं विविधरंगी कमळांनीं भरलेलें तळें. संगमरवरी प्राकार. थेट महाद्वारापर्यंत घडीव पाषाणाच्या पायऱ्या. आणि उंचच उंच सुवर्णशिखर.

देवाची पूजाअर्चा इतकी वैभवशाली कीं निर्माल्य म्हणून ताज्या सुंदर सुवासिक फुलांचें ढीग पडत. प्रसादाचे हंडे आणि मेवामिठाईचे

हारे चौकांत आणून वांटले जात. पंचामृतांनीं हौद भरत. आणि सुगंधी धूपानीं दिशा दरवळून जात.

सम्राटांचें भाग्यही असेंच शिगोशिग भरून गेलेलें. उत्कर्षाची कमान चढती, पराक्रमाची शर्थ दरारा वाढविणारी. देशामागून देश पादाक्रांत. राजांमागून राजे पराभूत आणि अंकित. नवरत्नांच्या खंडणीनें भांडार अगदीं भरून गेलेलें. जें कांहीं देशांत उत्कृष्ट तें सम्राटांना समर्पिलें गेलेलें. जें कांहीं त्यांना हवेसें वाटेल तें अगदीं सहज लाभलेलें. आज्ञा होण्यापूर्वीच तिची अंमलबजावणी. राजाज्ञेच्या भंगाला ताबडतोब अंतिम प्रायश्चित. कुणाची डोळा उचलून धमक नाही बघण्याची. सर्व लोक अगदीं नजरच्या धाकांत.

उषःकालापूर्वीच देवाची पूजा रचून होई. दिशा उजळूं लागतांच सनईवर पहाटच्या रागाचे सूर हळुवारपणें आळविले जात. सुगंधी शीतल वारा महाद्वारांतून सभामंडपांत शिरून गाभाऱ्यांतिल दीपज्योतीशेजारीं घुटमळत राही. स्वतः धर्माध्यक्ष कांहीं निवडक ब्राह्मणांसह देवाभोंवती वावरत, तेहि किती जपून.

शिवलिंगाशेजारील लालमाणकाची समई गाभाऱ्यांतील एक अमोल ठेवाच. एखाद्या मांडलिकाच्या सर्व संपत्तीबरोबरीचें तिचें मोल. ज्योतींच्या प्रकाशांत स्फटिकाच्या भिंतीमध्यें अशाच अनेक समयांची नि ज्योतींची प्रतिबिंबें उठलेलीं. सांखळीवरील असंख्य हिऱ्यांची चकमक डोळ्यांना दिपविणारी.

आणि उषःकालचें शिवाचन चालू असतांना समोर बसलेली महाराणी किती तरुण नि सुंदर. अभिषेकाच्या धारेकडे एकाग्र आणि विचारमग्न पाहणारी आणि त्या माणकाच्या समईतील ज्योतीहूनहि तेजस्वी.

तरुण आणि सुंदर. मुसमुसलेली, बहरलेली. रसरसलेली पाहताक्षणीच–

पण कुणीही पुरुषानें कधींहि तिला पाहिलेंच नव्हतें. लावण्यवती देखील तिला पाहून लज्जित होत. दुसरी कुणीही तिची दासीदेखील शोभणार नाही असें अलौकिक सौंदर्य होतें म्हणूनच ती महाराणी झाली.

एका आडरानांतील देवळाच्या गुरवाची ती मुलगी. अजून कळूं लागण्यापूर्वी पळवून नेलेली. पुरुषसंपर्कापासून अलिप्त अशा घनदाट अरण्यांतील दुर्गांत एका वृद्ध धात्रीच्या देखरेखीखालीं नृत्यगीतादि शिकवून वाढविलेली. देवळांतील दिव्याच्या ज्योतीवर पतंग येऊन झेंप घेत आणि होरपळत येवढीच तिची बालपणची स्मृति.

देशोदेशीं तिच्या लावण्याची कीर्ति पसरली होती. स्त्रियांनींच ती पसरविली. राजधानींत ती पालखींतून, अंबारींतून, घोड्यावरून सम्राटाबरोबर हिंडत असे, समारंभांतून मिरवत असे पण कुणींही पुरुषानें मान वर करून तिच्याकडे पहायचें नाहीं अशी कडक राजाज्ञा. तिचा भंग करून महाराणीच्या स्वर्गीय सौंदर्याचा आणि सम्राटांच्या सार्वभौम अधिसत्तेचा जो कोणी अपमान करील त्याला तात्काळ तेथल्या तेथे देहान्त प्रायश्चित्त मिळे. गाभाऱ्यांतील ब्राह्मणांना वाटे महाराणींचें तें सांनिध्य म्हणजे मानेच्या मणक्याला भिडलेलें तरवारीचें पातेंच.

ठीक सूर्योदयाला सम्राट देवदर्शनाला येत आणि त्यांचेबरोबर ती राजमंदिराकडे परत जाई. त्यांची ती आवडती राणी होती. पण ती त्यांचा मनापासून तिरस्कार करी. भीति होती ती सर्वांच्याच मनांत होती. तिच्या सौंदर्यानें आणि तारुण्यानें ते मोहित होते. राजेपणाच्या रुबाबाखालीं लपलेला कामातुर मानव तिच्यापुढें आपलें खरें स्वरूप लपवूं शकला नाहीं तो किती क्षुद्र आणि लाचार आहे हें तिला कळून चुकलें. प्रीति नसली म्हणजे कामुकता अनादर उत्पन्न करते. आणि प्रीति तरी किती लहरी, ती कुणाहि सम्राटाची अज्ञा कधींही मानीत नाहीं. तिला वाटेल तेव्हां

नको तेथे ती येते.

आपल्या भोंवती वावरणाऱ्या सर्व पुरुषांचाहि ती तितकाच तिरस्कार करी. कुणीहि तिच्याकडे बघून आपल्या डोळ्यांचें पारणें फेडलेलें नव्हतें. हें दलित आणि अवनत भित्रे गुलाम तिचें सौंदर्य, तारुण्य, आणि जीवित अरसिकपणें वाया दवडीत होतें. 'कुणी मर्दपणें आपणांकडे पाहील का? दृष्टीला दृष्टी भिडवील का? प्रीतीची भाषा बोलेल का?' असें तिला होऊन गेलें होतें. या विचारानें तिचे शरीर आणि मनहि अस्वस्थ होई. एक गोड झिणझिणी तिच्या सर्वांगाला पुलकित करून जाई. वृत्ती उत्कंठित होत. गात्रें उत्तेजित होत. तिला कसेसेंच होई. प्रातःकाळच्या पूजेच्या वेळीं तर तिचें मन अकारण अस्वस्थ झाल्याशिवाय रहात नसे.

आजहि असेंच झालें. उगीचच हुरहूर वाटूं लागली. उगीचच उत्कंठा वाटूं लागली. उत्शृंखल विचारांनीं आणि असंबद्ध आठवणींनीं काहूर माजविलें. मनाला शांत करण्यासाठीं तिनें नेहमीप्रमाणें त्या हिरव्यागार शिवलिंगाकडे नजर टाकली. लाल माणकाच्या समईंत शांतपणें तेवत असलेल्या ज्योतीनें तिचें लक्ष वेधून घेतलें. अरुणाचा प्रकाश महाद्वाराला उजळीत होता. क्षणार्धांत एक मोठा पतंग गाभाऱ्याच्या सोनेरी दारांतून सरळ आंत आला. आणि त्यानें त्या तेजस्वी दीपज्योतीवर झडप घेतली. क्षणभर झटपट झाली, चर्रर्रं असा आवाज झाला आणि माणकांच्या समईच्या साखळींतील हिऱ्यांना चमकाविणारी ती दीपज्योत शांत झाली. क्षणभर अंधुक झालें. अरुणाच्या तांबुस प्रकाशानें गाभाऱ्याचें अंतरंग उजळले. पतंगाची काजळलेली काया शाळुंकेशेजारीं पडलेली होती.

दीपज्योत शांत झाली तसें महाराणीचे मन भडकलें. पतंगासारखी आपणही प्रीतीच्या ज्योतीवर झेंप घ्यावी अन् –

पण इतक्यांत शहाजणें वाजूं लागलीं.. दुदंभींनी धीरगंभीर

बोल काढले. कोंवळ्या रविकिरणांनीं महादेवाला स्नान घातलें. सम्राटांनीं सभामंडपांत प्रवेश केला. गोडशा स्मितानें तिनें त्यांचें स्वागत केलें. राणीपणाच्या शालीनतेनें ती वागली.उधळलेल्या चित्तवृत्तींनीं मात्र कोणतेच संकेत पाळले नाहींत.

कांहीं वेळानें महाराणी सम्राटांबरोबर देवालयाच्या पायऱ्या उतरून राजमंदिराकडे निघाली. नेहमींप्रमाणें स्वच्छता आणि कडेकोट बंदोबस्त होता. ठिकठिकाणीं सैनिक अधोमुख आणि अधोदृष्टी उभे होते. सेवक मागेपुढें धांवत होते. दासी सान्निध होत्या.मंत्रिमंडळ माना खालीं घालून पावलें न वाजवितां सामोरें येत होतें. सम्राट आज विशेष खुशींत होते. महाराणीची दृष्टी मात्र चंचल, कावरीबावरी, समोर जणुं कांहीं तरी शोधीत होती. ही तिची दृष्टीच आज सम्राटांच्या प्रसन्नतेला कारण झाली होती. त्यांना ती मृगयावनांतील हरिणींच्या सतेज, मोहक, आणि थिल्लर दृष्टीची आठवण करून देत होती. हरिणींच्या डोळ्यांहून कितीतरी पाणीदार आणि भुलविणारे, वेड लावणारे डोळे होते तिचे !

त्या प्रशांत आणि प्रसन्न प्रभातकाळीं ती न्हालेली, शृंगारलेली सौंदर्यसम्राज्ञी आपल्या सगळ्या वैभवाच्या लवाजम्यासह त्या देवमंदिराच्या पायऱ्या हळुहळु उतरत असतांना स्वत: सम्राट तिच्या मोहकतेचे दास बनून तिच्या मुखावर दृष्टी लोचटपणें खिळून राहिल्यामुळें पायरी चुकत अडखळत होते.

इतक्यांत तिची दृष्टी पायथ्याशीं शेवटच्या पायरीवर असलेल्या एका तरुणाकडे वेधली गेली. त्याच्या वेषांत सभ्यता होती; रूपांत रेखीवपणा होता, डोळ्यांत तेज होतें, मुद्रेवर उत्सुकता होती. तो अनिमिष आणि अतृप्त लोचनांनीं एकसारखा तिच्याकडे पहात होता. महाराणीला नवल वाटले. तिची चांगलीच चलबिचल झाली. मुखावर स्मित चमकलें. मनांतील सुखसंवेदना रोमरोमांतून ओसंडूं लागली. ती सारखी टक लावून त्याकडे पाहूं लागली.

सम्राटांचे याकडे लक्ष गेले. क्षणभर ते संतापानें लाल झाले. मोठ्या प्रयासानें त्यांनी आपले गौरव आणि गांभीर्य परत आणलें झपझप उरलेल्या पायऱ्या उतरून ते त्याच्याजवळ आले. त्या तरुणाला याची दखलही नव्हती.

"कोण आपण?" कमालीच्या संयमानें त्यांनीं त्याला विचारलें.

"मी आपला प्रजाजन नाहीं." त्यानें महाराणीवर खिळलेली आपली नजर न वळवितां उत्तर दिलें.

'कोठून आला?'

'ज्या देशावर आपलें स्वामित्व नाहीं तेथून.'

इतक्यांत महाराणी तेथें येऊन पोंचली. तिनें त्याच्याकडे पाहून एकदां मधुर स्मित केलें. चटकन् तिचा हात धरून सम्राट पुढें चालूं लागले. त्यांच्या नेत्रसंकेताबरोबर सशस्त्र सैनिकांनीं त्याला गराडा घातला. तो अगदीं भान विसरून सारखा तिच्याकडे पहात होता. तीहि त्याच्याकडे वळून वळून पहात होती, अंबारींत बसण्यापूर्वी ती म्हणाली, 'हा कोणी परदेशी प्रवासी राजधानींत आपला अतिथि म्हणून आलेला त्याला बंदिवास कां?'

'महाराणीनें लीलाविलासांत दंग असावें. राजकारणांत लक्ष घालूं नये.'

'कोण, कुठला, इत्यादि चौकशीहि न करतां—'

'त्याची रीतसर चौकशी महाराणीदेखत न्यायाध्यक्ष करतील.'

'आणि अनेक प्रजाजनांचा जसा अमानुषपणें वध झाला तसा—'

'महाराणीच्या इच्छेखातर त्याला जीवनदानहि दिलें जाईल.'

कांहीं दिवसांनीं महाराणीच्या देखत न्यायालयांत त्याची चौकशी झाली. दूरच्या देशांतील एका महान् सधन सावकाराचा तो एकुलता एक मुलगा. निसर्गानेंच त्या देशाच्या सरहद्दीचें संरक्षण करून सम्राटांना बोटें मोडीत बसविले होते. घराण्यांतील पिढीजात श्रीमंतीनें

राजापासून रंकापर्यंत सर्वांना ऋणाईत करून ठेवलेले होते. देशोदेशी साहसें करीत फिरणें, देशोदेशीच्या सौंदर्यवतींना पळवून आणणें हा त्याचा छंद. आणखी सकस सौंदर्य, अलौकिक, काळजांत कालवाकालव उत्पन्न करणारें, भान विसरविणारें स्वर्गीय सौंदर्य शोधणें, त्यासाठीं वाटेल तें साहस करणें हेंच त्याचें काम, अशी त्याची माहिती राजदूतांनीं मिळवली होती. राजधानींत तो नुकताच आला होता.

'सम्राटांचें शासन तुला माहीत होते ना? या अपराधाला देहान्त प्रायश्चित्त मिळतें हे तुला माहीत होते ना?' न्यायाध्यक्षानें त्याला विचारले.

'होय, अगदीं चांगलें माहीत होते.'

'देशोदेशींच्या सुंदरींना पळवून नेण्याचा तुझा धंदा आहेना?'

'मुळींच नाहीं. ज्यांनीं या तरुणींच्या सौंदर्याची किंमत न ओळखतां त्यांच्यावर नुसती मालकी गाजविली त्यांना कंटाळून त्या मजबरोबर आल्या. मी सौंदर्याचा उपासक आहे. सुंदरींची आराधना करणें फक्त जाणतों. त्यांना दास्यांत ठेवण्याचा अरसिकपणा कधींच करीत नाहीं.'

'मग तूं हें साहस कां केलेस?'

'जिच्या लावण्याची कीर्ति दिगंत पसरली आहे, तिचें एकवार दर्शन घ्यावें म्हणून. एका राजाच्या जुलमी लहरीमुळें जगांतील रसिकांचे नेत्र या स्वर्गीय दर्शनसौख्याला वंचित व्हावेत हें मला मान्य नाहीं. जुलमी सत्तेच्या बंधनांत कोंडून ठेवलेलें हें दृष्टीचें अमृत साहसाची, चातुर्याची, पराक्रमाची, चपळाईची शर्थ करून स्वातंत्र्याच्या जगांत न्यावें म्हणून मी येथें आलों. माझ्या देशांत ही देवता सर्वांना सरास दर्शन देऊं शकेल—ज्याच्या उपासनेनें प्रसन्न होईल त्याला प्रसादहि देईल.'

'पण आत्मनाशाशिवाय दुसरें कांहीच साधलें नाहीं' न्याया

ध्यक्षांनी हसून म्हटले.

'अचानक महाराणीचें दर्शन घडलें,त्यानें माझें देहभान हरपलें. स्वतःला मी पूर्णपणें विसरलों. काय झालें याची जाणीव होण्यापूर्वीच जें काय व्हावयाचें तें होऊन गेलें.'

'तुला आणखी कांहीं सांगायचें आहे का?'

'कांहीं नाहीं. माझ्या नेत्रांचें पारणें फिटलें आहे. माझ्या जीवनाचें सार्थक झालें आहे. माझा न्याय करायला बसलेले तुम्ही सत्तेचे गुलाम जिच्याकडे नुसते डोळे उचलून बघूंहि शकत नाहीं, तिला मी आजहि डोळे भरून पहात आहे. अन्तःकरण मी तिजपुढें बोलून दाखविलें आहे–'

त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं. 'तुजवरील सर्व आरोप सिद्ध झाले असले तरी सम्राटांनीं दयावंत होऊन तुला जीवदान दिलें आहे. तुझ्या अपराधाचें दुसरें योग्य शासन काय द्यायचें यासंबंधीं त्यांची आज्ञा होईल' असें न्यायाध्यक्षांनी सांगितलें आणि त्याला तेथून नेण्यांत आलें.

महाराणी विमनस्क स्थितींत तेथून आपल्या महालाकडे आली. ती कुणाशीं कांहीं बोलली नाहीं. तिनें आपल्या मनांतील खळबळ एकांतवासांत कोमेजलेल्या गुलाबांवरील अश्रूंनी शांत करण्याचा प्रयत्न केला. पण ती पुरती शांत झालीच नाहीं. त्या सुंदर तेजस्वी, सालस तरुणाची मूर्ती तिच्या डोळ्यांसमोरून हलेचना. त्याचें साहस जर सिद्ध झालें असतें तर किती छान झालें असतें असें तिला वाटूं लागलें. सम्राटांचा ती आधिकच तिटकारा करूं लागली.

दुसरें दिवशीं सम्राटांनीं एक बहुमोल हिऱ्याची कंठी तिला नजर केली. महाराणीच्या कंठाला साजेल असेंच अलौकिक तिचें तेज होतें. कारागिराच्या कसबानें त्या हिऱ्यांचे पैलू इतके सुंदर पाडले होते कीं जवाहिऱ्यांनाहि तें पाहून कांहीं काळ अंधत्व आल्यासारखें व्हावें. असा अलंकार पुन्हां घडविला जाऊं नये म्हणून त्या कारागिराचा शेवट

करण्यांत आला होता. एका मांडलिकानें ती आपल्या भांडारांत लपवून ठेवली होती. पण फितुरीनें ते सम्राटांना कळलेंच. आणि ती कंठी सम्राटांकडे आली. या वेळीं महाराणीनें त्या तरुणाची गोष्ट त्यांच्याजवळ काढलीच. तिला राहवलें नाहीं. 'त्याला जर जीवदान दिलें आहे तर सोडून कां देत नाहीं ? आणखी दुसरी कोणती शिक्षा त्याला होणार ?'

'त्याला त्याच्या अपराधानुरूप शासन होईल पण महाराणीचें जर त्यावर एवढें मन बसलें आहे तर तो मुक्तहि होईल. लवकरच तिची त्याची भेटहि होईल' असें सम्राटांनीं उत्तर दिलें.

कांहीं दिवसांनीं एका सकाळीं नित्याप्रमाणें ती सम्राटांबरोबर देवळाच्या पायऱ्या उतरत असतां पायथ्याशीं तो तरुण तिला दिसला. सम्राटांनींच मिस्किलपणें हंसून त्याच्याकडे तिचें लक्ष वेधलें. महाराणी लगबगीनें त्याच्याजवळ आली. त्याचा वेष मलिन होता, रूप मलूल होतें, मुद्रेंत विषाद होता, डोळ्यांत तेज—डोळेच नव्हते. काठीचा देखील आधार नव्हता. लाचारपणें तो पायरीला अडखळत होता.

काय झाले हें महाराणीच्या चटकन् ध्यानांत आलें. सम्राटांच्या या अमानुष करणीचा तिला मनस्वी संताप आला. अतोनात दुःख झालें. कसलाहि विचार न करतां ती लगेच पुढें झाली आणि त्या अंध तरुणाचा हात धरून म्हणाली:–'पुढें पायरी आहे.'

तो नाजुक स्पर्श आणि तो मधुर आवाज यांनीं तो अगदीं चकित, पुलकित, सुखित झाला.

'कोण आपण ?' त्यानें कातर स्वरानें विचारलें. 'कुणीहि मला कसलेंहि सहाय्य करील तर राजाज्ञेनें त्याला देहांत शासन मिळेल अशी झालेली घोषणा आपण ऐकली नाहीं का ? माझ्यासाठीं आपला जीव धोक्यांत'–पुढें त्याच्यानें बोलवलें नाहीं.

इतक्यांत सम्राट तेथें येऊन पोंचलें आणि म्हणाले 'देशोदेशींच्या पळवून आणलेल्या लावण्यवतींच्या तुझ्या राणीवंशांत हें वृत्त समजलें म्हणजे त्या येथें धांवत येतील आणि अनायासेंच त्यांची महा-

राणीशी तुलना होईल. होय ना ?' सम्राटाचा आवाज त्यानें ओळखला. तो पूर्ण उद्वेगानें आणि तिरस्कारानें म्हणालाः– " मला राणीच नाहीं. देशोदेशींच्या आलेल्या लावण्यवती आपल्या मनाच्या मुखत्यार होत्या. ज्यावर प्रसन्न झाल्या त्याबरोबर सुखी झाल्या. सुंदरींच्या शरीरावर अधिकार गाजवणें म्हणजे कांहीं पुरुषार्थ नव्हे; त्यांचें मन राजी हवें."

कांहींहि न बोलतां महाराणी तेथून चालती झाली. अंबारींत सम्राट तिला म्हणालेः– " आपल्या तेजावर झेप घेऊन होरपळणाऱ्या पतंगाबद्दल दीपज्योतीनें इतकी सहानुभूति कां दाखवावी ?"

" पतंगानीं होरपळायला नको असेल तर दीपज्योतीनेंच शांत व्हावें." ती अगदीं कडवटपणें म्हणाली. सम्राटाला वाटलें–स्त्रीहृदय-सहज हळवेपणा आहे. जाईल कांहीं दिवसांनीं.

महाराणीला वाटलेंः–आपलें लावण्यच साऱ्या अनर्थाला कारण आहे. तें जर नसतेंच तर सारेजण किती सुखी झाले असतें !

त्या हतभागी तरुणाला वाटलें–जिनें आपला हात धरून ' पुढें पायरी आहे.' म्हणून सांगितलें ती महाराणीच असेल का ? किती सुखद तिचा स्पर्श ! किती गोडगोड तिचें बोलणें ! आणि पुढें पायरी कुठली ! काय राहिलें आहे पुढें जीवितांत ?

त्याच दिवशीं अपरात्री देवालयाच्या पायथ्याशीं चौकांत पिंपळाच्या पारावर तो झोंपला असतांना त्याला कुणीतरी हळूंच जागें केलें.

" कोण ?"

" आपणाला आपल्या देशाला न्यायला आलें आहे."

" माझा देश किती दूर आणि हें प्राणांतिक साहस–"

" आपल्याला एका क्षणाचाहि अवधी नाहीं." तिनें त्याचा हात धरला. त्यानें एकदम चमकून म्हटलें,–

" कोण ? महाराणी ?"

" होय, सीमेबाहेर पडेपर्यंत तरी महाराणीच."

काय बोलावें हेंच त्याला कळेनासें झालें. तिच्याबरोबर आलेल्या वृद्ध विश्वासू माहुतानें चटकन् त्या दोघांना हत्तीवर घेतलें आणि उजाड-

ण्यापूर्वी राजधानीपासून दूर अरण्यांत नेलें. दिवसां दाट अरण्यांत दडून रहायचें आणि रात्रीं वेगानें प्रवास करायचा असें करून त्या माहितगार आणि कुशल माहुतानें सीमा गांठली. महाराणीनें त्याला भरपूर धन देऊन निरोप दिला. त्यानें तो हत्ती अरण्यांत सोडून दिला. इतका मोठा हत्ती कुणीहि कुठेंहि पाहिला नव्हता. तो त्या माहुतालाच तेवढा वश होता.

सीमेवर त्या भाग्यशाली अंधानें तिला विचारलें, "आणि महाराणी राजधानीला परत कशा जाणार?" तिनें त्याला आलिंगन दिलें आणि म्हटलें, "हेंच माझें राज्य आणि हीच माझी राजधानी!"

सम्राटांना याबद्दल काय वाटलें हे कधींच कळलें नाहीं. पण जवळचे लोक म्हणत–"दुसऱ्यानें पाहिलेलें, उष्टावलेलें, दूषित झालेलें तिचें सौंदर्य त्यांना मुळींच मोलाचें नव्हतें."

"पण या सौंदर्यसम्राज्ञीनें आपलें थोर पद माझ्यासाठीं का सोडलें हे कोडें कांहीं उलगडत नाहीं." तो अंध तरुण म्हणे. आणि महाराणी उत्तर देई:–"नाहींच उकलायचें. तुम्ही सौंदर्याच्या शोधांत दृष्टि घालविली; तिनें हृदयाच्या शोधांत साम्राज्य घालविलें– मिळविलें ना हृदय पण!"



## विनय-भंग

"न खलु बहिरूपाधीन् प्रीतयः संश्रयन्ते."

भवभूति.

एकंदरीत त्या प्रसंगाला एखाद्या सामन्याचें स्वरूप आलें होतें. त्या अरुंद जिन्याच्या मधोमध तिची वाट अडवून तो रागानें तिच्याकडे बघत होता. वरच्या पायरीवर ती उभी होती. जिन्याच्या वरच्या आणि खालच्या टोकाला ठळक अक्षरांत पाटी होती. "**फक्त प्राध्यापक आणि विद्यार्थिनींसाठीं**," जिन्याच्या वरच्या टोकाला विद्यार्थिनींचा घोळका जमला होता आणि खालच्या टोकाला विद्यार्थी जमाव करून उभे होते. तो तणतणला :—

"शुक्शुक् म्हणे! मी काय मांजर आहे का कुत्रा! असला अपमान कोण सहन करील? काय म्हणून तुम्ही मला शुक्शुक् म्हणालात? याचा जाब द्या नाहीतर क्षमा मागा."

काय करावें हें सुचलें नाहीं म्हणून ती अंग चोरून जेथल्या तेथें उभी राहिली. अनपेक्षितपणें हा प्रसंग तिच्यावर आला होता. तो बाजूला झाल्याशिवाय पुढें पाऊल टाकणें शक्य नाहीं आणि मागें फिरावें तर –

– पण काय म्हणून मागें फिरायचें ?

" बाजूला व्हा, मला खालीं जायचय्"

" क्षमा मागितल्याशिवाय नाहीं."

तिला वाटलें म्हणावें एकदा 'क्षमस्व,' पण वरच्या घोळक्यांतून एक विद्यार्थिनी म्हणाली,

" कसली क्षमा मागायची ! लेडीजच्या जिन्यानं वर यायला लाज नाहीं वाटत ?"

यामुळें वातावरण चांगलेंच गरम झालें. वरच्या आणि खालच्या घोळक्यांतून कुणालाहि उद्देशून नसलेलें अनेक उद्गार निघाले.

" क्षमा मागितली पाहिजे" खालच्या घोळक्यानें एकमुखानें मागणी केली.

" कांहीं कारण नाहीं. कां क्षमा मागायची ?" वरच्या घोळक्यानें उत्तर दिलें.

ती परत वर जाण्यासाठीं वळतांच वरून एक विद्यार्थिनी म्हणाली –

" जागची हलं नकोस. काय करतोय् बघूं या."

खालच्या घोळक्यांतून आरोळी आली –

" बकू अप् बापू टकले !"

ती गोंधळली, संकोचली, लाजली, सगळे डोळे तिच्याकडेच लागलेले होते. आणि तो समोर इतका जवळ उभा होता कीं –

इतक्यांत प्रोफेसरांच्या खोलीचें दार उघडून व डोळ्यांवरचा चष्मा हातांत घेऊन प्राध्यापक नानासाहेब नेने बाहेर व्हरांड्यांत विद्यार्थिनींच्या घोळक्यामागे आले नि म्हणाले:–" मिस्टर टकले इकडे या"

नानासाहेब नेने शरीराने कृश, वर्णानें गोरे, हंसतमुख, शांत, खिलाडू वृत्तीचे, वाचनाचे नादी, कमालीचे लोकप्रिय असे प्रोफेसर होते. कपडयांकडे त्यांचे कधींच लक्ष नसे. एकदा वर्गांत ते बोडकेच आले आणि येतांना कालव्यांत आपली पगडी पडल्याचें सांगून त्यांनीं प्रसन्नपणें लेक्चरला सुरवात केली.

तिनें अगदीं कठडयाला टेकून त्याला वाट दिली. आणि तो भराभर जिना चढून वर आला. विद्यार्थिनींनी त्याला आपल्यांमधून केसांतल्या भांगासारखी वाट करून दिली आणि तो नानासाहेबांच्या मागोमाग त्यांच्या खोलींत शिरला. खालच्या जमावानें ओरड केली –

"ब्रेव्हो ! बापू टकले"

खालच्या मजल्यावर प्रिन्सिपाल करकरे ऑफिसांतून बाहेर पडले असें दिसतांच विद्यार्थ्यांचा जमाव दुभंगला. त्यांचा गार्ड ऑफ ऑनर घेत ते त्याच जिन्यानें वर यायला निघाले.

शरीर धिप्पाड, रंग काळाभोर, चेहरा ओबडधोबड, मुद्रा करडी. कपडे टाकटींक, बोलणें कमी. हंसणें मुळींच नाहीं. अशा करकऱ्यांचा विद्यार्थ्यांवर वचक भलताच होता. फिजिक्स त्यांचा शिकवण्याचा आणि शिस्त वागण्याचा एकमेव विषय होता. कडकपणामुळें ते विद्यार्थ्यांना अगदीं अप्रिय होते.

ती क्षणभर विचारांत पडली, थांबली, थबकली, पण तशीच त्यांच्यासमोरून विद्यार्थ्यांच्या रांगांमधून सरळ समोर बघत ऑफिसकडे निघून गेली.

प्रिन्सिपाल वर येतांच विद्यार्थिनींनी त्यांना गराडा दिला आणि त्यांच्याशीं बोलतच त्या त्यांच्या खोलींत शिरल्या. खालचा विद्यार्थ्यांचा जमावही पांगला, कांहीं कॉलेजसमोरच्या इराण्याच्या हॉटेलांत, कांहीं लायब्ररींत, आणि कांहीं ऑफिसांत गेले.

बापू टकले हा वास्तविक अगदीं सालस विद्यार्थी. आज इतका तो कां खवळला हें नानासाहेबांना कळेना. "बसा, जस्ट ए मिनिट" असें म्हणून त्याला शांत करण्यासाठीं त्यांनीं बराच वेळ आपणासमोर

बसवून ठेवलें. आणि आपण कामांत गढून गेल्यासारखें दाखविलें. पण त्यांनीं पाहिलें कीं, तो अस्वस्थ असा मनांतल्या मनांत चडफडत आहे तेव्हां मृदु स्वरांत ते त्याला म्हणालेः—

"व्हरांड्यांतून मी तुम्हांला लवकर येण्यासाठीं सांगितलें आणि तुम्हीं विद्यार्थिनींशी हुज्जत घालीत बसलांत?"

"चांगलं!" बापू टकले रागानेंच म्हणाला. "आपण मला लौकर यायला सांगितलं म्हणून तर मी प्रोफेसरांच्या जिन्यानें घाईघाईनें यायला निघालों."

"आणि अर्ध्या वाटेंतच या रोमियोला त्याची ज्युलिएट भेटली वाटतं?" नानासाहेब हंसत हंसत म्हणाले. कोणत्या तीव्र शब्दांत या आरोपाचा इन्कार करावा हें त्याला कळेना.

"पण सर, हें चांगलं का? ती जिना उतरून येत होती हें मी पाहिलं नसेल. म्हणून काय शुक् शुक्? मी काय मांजर आहे कां कुत्रं? का मला राग नाहीं येणार? लेडी स्टुडंट झाली म्हणून काय झालं? कुणाचाही अपमान करायचा वाटतं. कोण सहन करील असलं?"

"तुम्ही तिचें मांजर आणि कुत्रं व्हावं अशी अपेक्षा तिनं अशा नाजुक रीतीनं व्यक्त केली असेल तर किती अरसिक ठरलांत बरं?"

नानासाहेबांच्या या भाषणानें बिचारा अगदीं निरुत्तर झाला. काय बोलावें हें न कळून तो म्हणालाः—

"छेः छेः सर, तिची माझी ओळखसुद्धां नाहीं. आपल्याच तोऱ्यांत तिनं माझा असा उपमर्द केला आहे आणि—"

"मग तुम्ही काय केलं?"

"तिला क्षमा मागायला सांगितलं तिथल्या तिथें."

"मग तिनें काय केलं?"

"कांहीं नाहीं" तो घुटमळत म्हणाला.

"मग तुम्ही काय केलं?"

"आपण हांक मारली म्हणून आपल्या मागोमाग आलों."

"तिच्याकडून माफीनामा न घेतांच?"

" नाहीं सर, तसं नाहीं, पण कुणाला राग येणार नाहीं ?"

" ठीक आहे. माझं काम झालं. प्रेम करायचं झालं तरी त्याचं असं प्रदर्शन करूं नये."

" नाहीं सर, तसं मुळींच नाहीं. ती कोण काय हें देखील मला माहीत नाहीं."

नानासाहेब यावर कांहीं बोलले नाहींत. लेडीज रूमवरून तो जाऊं लागला तेव्हां विद्यार्थिनी आपल्याकडे पाहूनच आपापसांत कुजबुजत आहेत असें त्याला भासलें. तो वर्गाशेजारी येतो तों मधली सुट्टी संपल्याची घंटा झाली. नानासाहेबांनीं किती वेळ आपल्याला बसवून ठेवलें याची जाणीव या वेळीं त्याला झाली. मनांतून तो अगदीं चिडून गेला. पुढचा नानासाहेबांचाच तास बुडवून जावें इतकें त्याचें मन अस्वस्थच झालें होतें. पण नानासाहेबांचा तास म्हणजे कॉलेजची रंगत. कुणीहि तो कधींहि बुडवीत नसे. परके विद्यार्थीदेखील संधि साधून येऊन बसत. काय करावें या विचारांत तो आहे इतक्यांत वर्गांतल्या विद्यार्थ्यांनीं त्याला पाहिलें. कांहींजणांनीं त्याला समारंभानें वर्गांत नेलें.

एकानें म्हटलें, " थ्री चिअर्स फॉर दि हीरो ऑफ दि डे. बापू टकले ! हिप् हिप् हुरे ऽऽ" इतरांनीं त्याला साथ दिली.

इतक्यांत नानासाहेबांनीं वर्गांत पाऊल टाकले आणि जिकडे तिकडे शांतता झाली. नाइलाजानें त्याला वर्गांत बसावें लागले. शिरस्त्याप्रमाणें प्रोफेसरांमागून विद्यार्थिनी आल्या पण त्यांच्यांत ती नव्हती.

" आज ती कां दिसत नाहीं रे ?" त्याच्या शेजारच्या विद्यार्थ्यानें म्हटलें.

नानासाहेबांनीं आपला चष्मा साफसूफ करून चढविला. एकदां वर्गाचें निरीक्षण केलें. आणि ते सुरवात करणार इतक्यांत ती दारांत येऊन म्हणाली:–" येऊं का मी आंत ?"

" हो हो, यावं, तृषित चातक मेघमाले, यावं !"

स्टॅम्पिंगनें वर्ग दुमदुमून गेला. वास्तविक नानासाहेबांनीं शिकवीत असलेल्या पुस्तकांतलें तें वाक्य वाचलें होतें–पुन्हां एकदां सर्वांच्या तीक्ष्ण दृष्टीचा ती विषय झाली. ती लाजली, संकोचली पण ताठ मानेनें आपल्या जागेवर येऊन बसली.

अर्थात् तरुण होतीच, काळीसांवळीच होती. नाजुक होती पण अशक्त नव्हती. सडपातळ होती पण रोड नव्हती. डोळे काळेभोर पाणीदार, नाक सरळ, जिवणी लहान, वेषभूषा आकर्षक होती पण भडक नव्हती.

नानासाहेबांनीं गंभीरपणें आपलें अध्यापन सुरू केलें पण विषय नायकनायिकेच्या प्रणयप्रसंगाचा आणि त्यांची शिकविण्याची शैलीच इतकी मनोरंजक कीं वर्गाला वारंवार आपला उत्साह स्टॅम्पिंगनें व्यक्त केल्याशिवाय राहवणेंच अशक्य होतें. मानसशास्त्रांतले सिद्धांत सांगून व्यवहारांतली आणि ग्रंथांतरींचीं उदाहरणें देऊन, ग्राफ, चित्रें आणि नकाशे काढून, अभिनय करून, ते आपला विषय इतका रंगवीत कीं, तास केव्हां संपला याचें कुणालाच भान रहात नसे.

पण बापू टकलेला मात्र आज तास केव्हां संपेल असें झालें होतें. उशीरा आल्यामुळें तिला विद्यार्थ्यांच्या अगदीं जवळच्या गैरसोयीच्या सीटवर बसावें लागलें होतें. उत्साहाच्या भरांत समोरच बापू टकलेला विद्यार्थ्यांनीं आधींच बसविलें होतें. प्रोफेसर अचानक वर्गांत आल्यामुळें त्याला नाइलाजानें तेथें बसून रहावें लागलें होतें. त्याला वाटलें, विद्यार्थिनीं आपल्याकडे बघून गालांतल्या गालांत हंसत आहेत. आणि ती तिरस्कारानें सारखी आपणाकडे पहात आहे. विद्यार्थिनीं हंसत, मुसकारत होत्या; पण त्या नानासाहेबांच्या नाजुक कोटिक्रमामुळें. आणि ती त्याच्याकडे पहात होती खरी, पण तो तिच्या सरळ दृष्टिपथांत होता म्हणून. खालीं मान घालून बसणें तिच्या स्वभावांतच नव्हतें.

" तो बघ टकले समोरच बसला आहे " शेजारची मुलगी तिला हळूच म्हणाली. तिनें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

" कुठें होतीस गं तूं? आम्ही प्रिन्सिपालना सांगितलं सर्व कांहीं."

तरीही ती कांहीं बोलली नाहीं. वर्गातील सर्वांत सभ्य विद्यार्थी आज आपल्याशीं अशा रीतीनें कां वागला? आपलेंच चुकलें का? तो मनांत काय समजत असेल? असा कांहींतरी विचार करीत त्याच्या चेहऱ्यावरील भाव समजून घेण्यासाठीं ती त्याच्याकडे पाही. त्यांची नजरानजर होई आणि तो आपलें तोंड वळवी.

तास संपण्य चें वेळीं गडयानें एक चिठ्ठी आणून दिली. नानासाहेबांनीं ती वाचली आणि म्हटलें:—

" मिस्टर टकले यांनीं ताबडतोब प्रिन्सिपालना भेटावें "

बापू टकले प्रिन्सिपालकडे जायला निघाला तेव्हां " झाला हा आपल्या हातून अतिप्रसंगच झाला आपण रागाच्या भरांत जें करायला नको होतें तें केलें " असें त्याचें मन त्याला सांगत होतें. नानासाहेब प्रिन्सिपालशीं बोलत होते म्हणून त्याला थोडावेळ बाहेर थांबावें लागलें, परत जातांना त्यांनीं त्याच्याकडे पाहून नुसतें स्मित केले. बापू टकले आंत जातांच प्रिन्सिपाल करकरे त्याला करड्या स्वरांत म्हणाले:—

" मिस्टर टकले, डू यू प्लीड गिल्टी ?"

" कशाबद्दल ? "

" दुर्गा डोंगरेचा तुम्ही विनयभंग केला ? "

क्षमा मागावी असें त्याला जें वाटत होतें तें मन बदललें. आपण कांहीं घोर अपराध केला असें त्याचें त्याला मुळींच वाटेना.

" खरी हकीगत काय आहे तें जाणून घेऊन आपणच काय तें ठरवा." त्यानें जरा ताठरपणेंच उत्तर दिलें.

" तुम्ही आपलें म्हणणें थोडक्यांत सांगा."

त्याचें म्हणणें ऐकून घेऊन त्यांनीं त्याला नुसतें जायला सांगितलें.

विद्यार्थ्यांना खात्री होती कीं, बापू टकलेला कॉलेजांतून हाकून दिल्याची नाटीस येणार. तशी ती कां आली नाहीं, याचें विद्यार्थिनींना आश्चर्य वाटलें. बापू टकलेला खात्री होती कीं नानासाहेबांनीं आपल्यासाठीं रदबदली केली. त्यांच्याविषयींचा त्याचा आदर दुणावला. पुन्हां कुणाही विद्यार्थिनीकडे बघायचेदेखील नाहीं अशी मनाशी खूणगांठ बांधून त्यानें आपलें मन अभ्यासाच्या नादीं लावलें. नानासाहेबांचा शब्द कधीं खालीं पडत नसे हें खरें, पण या प्रकरणांत कांहीं वेगळेंच झालें होतें.

प्रिन्सिपालनीं दुर्गा डोंगरेला बोलावून घेतली आणि म्हटलें, " टकलेला रस्टिकेट करायचें मी ठरविलें आहे. "

" कशाकरितां ?"

" त्यानें जिन्यांत तुझ्याशीं असभ्य वर्तन केलें. "

" असं कोण म्हणतं ?"

" दुसऱ्या विद्यार्थिनींनीं मला सर्व हकीगत सांगितली आहे. "

" पण मी कांहींच तक्रार केलेली नाहीं. "

" तो लेडीजच्या जिन्यानें वर गेला या शिस्तभंगाबद्दल त्याला शासन झालेंच पाहिजे. "

" तो जिना प्रोफेसरांचाही आहे. आणि नानासाहेबांच्या तांतडीच्या बोलावण्यावरून तो घाईनें त्या जिन्यानें वर येत होता एवढ्यासाठीं त्याला रस्टिकेट ?"

" त्यानें तुझ्याशीं अतिप्रसंग केला असें तुला वाटत नाहीं ?"

" तो माझा वैयक्तिक प्रश्न आहे. मी येऊन तक्रार केली आहे का ?"

प्रिन्सिपालनी तिला जायला सांगितलें, पण ती दारापर्यंत जाते तोंपर्यंत परत बोलावून विचारलें.

" दुर्गा, तुला कुणी विद्यार्थी प्रेमपत्रें पाठवितात का ?"

" नाहीं – कां ?"

" इतर कांहीं विद्यार्थिनी तशी तक्रार करतात म्हणून विचारलें."

" कुणाचीं प्रेमपत्रें आलींच, तर मी त्यांना नकाराचीं उत्तरें लिहीन म्हणजे झालं. तक्रार करण्याचें कारण काय ?"

दुर्गा डोंगरेनें आपल्याला अशीं उत्तरें द्यावीं, हें प्रिन्सिपालनां आवडलें नाहीं. पण कांहीं न बोलतां त्यांनीं तिला जायला सांगितलें. आणि हें प्रकरण निकालांत काढलें.

नानासाहेबांना यांतलें कांहींच माहीत नव्हतें. त्यांना वाटलें, आपल्याच सांगण्यावरून प्रिन्सिपालनीं टकलेला क्षमा केली असावी. साहजिकच बापू टकले आणि दुर्गा डोंगरे यांना एकमेकांबद्दल तिरस्कार वाटत राहणार. दोन चांगल्या व्यक्ति एकमेकांशीं दुष्टाव्यानें वागणार. त्यांच्यांत सौहार्द कधींच निर्माण होणार नाहीं. असा निर्णय मानसशास्त्राच्या चिकित्सक आणि सखोल दृष्टीनें प्रत्येक गोष्टीकडे बघणाऱ्या त्यांच्या मनानें ठरवून टाकला.

कांहीं दिवस गेले आणि बापू टकलेच्या मनानें घेतलें कीं झाल्या गोष्टीबद्दल आपण दुर्गा डोंगरेची क्षमा मागितली नाहीं हें बरें केलें नाहीं. पण क्षमा मागायची कशी ? सरळ तिच्याकडे जावें आणि क्षमा मागावी. पण तिनें पूर्वग्रहदूषित होऊन आपल्या वर्तनाचा भलताच अर्थ केला तर ? " मेला लोचटपणा करायला लागला " असें ती म्हणाली तर ? पत्र लिहावें. आणि लिहितांना आपण एखादा उणा-अधिक शब्द लिहून गेलों तर ? फट् म्हणतां कांहींच्या कांहींच व्हायचें, या पत्रांतून आपल्या मनांत नसलेले भलतेच अर्थ निघायचे आणि ती तें पत्र घेऊन प्रिन्सिपालकडे जायची. सरळपणें लिहिलेल्या पत्राचा असा खंडोबा विद्यार्थिनीनें केल्याचें उदाहरण कॉलेजांतच घडलें होतें. तरी पण त्यानें पत्राचे मसूदे करण्यांत दिवस आणि कागद कांहीं कमी खर्च केले नाहींत.

दुर्गा डोंगरेच्या मनाची चलबिचल सारखी चालू होती. आपणच

क्षमा मागायला हवी होती. पण मैत्रिणींच्या गलक्यानें आपण ऐन वेळीं बुजलों आणि आतां आपल्याला जाऊन क्षमा मागण्याचें धैर्य नाहीं. काय असेल तें असो. त्याच्या संबंधींचे विचार तिच्या मनांत दिवसें-दिवस जास्त घोळूं लागले. कोकणांत नोकरीवर असलेल्या एका जुन्या चालीच्या मामलेदाराचा तो एकुलता एक मुलगा आहे आणि रेसिडेन्सींत राहतो ही माहीत नसलेली गोष्ट तिला कळली. पण मुलांच्या रेसिडेन्सींत ती त्याला भेटायला कशी जाणार ! कॉलेजांत तरी कशी भेटणार ! इतर विद्यार्थीविद्यार्थिनी काय कुजबुजतील ? नाद सोडावा झालें, अशा मनोभूमिकेंत तिनें त्याला विसरून जायचें ठरविलें पण—रोज त्यांची वर्गांत दृष्टादृष्ट होई. डोळे ओळखीची देवाणघेवाण करीत. चेहरे निर्विकार ठेवण्याचा निष्फळ प्रयत्न होई. कधीं स्मित, कधीं लाली, कधीं गोंधळ यांच्या छटा त्यांवर येत. आणि असेंच दिवसांमागून दिवस गेले.

परीक्षेंत क्लास, वक्तृत्वांत बक्षीस, मानेंत ताठा आणि मनांत हुरहूर असे तिचे कॉलेजांतले दिवस गेले. त्यानें परीक्षेंत जेमतेम यश मिळाविलें, नाटकांत काम केले, टेनिस खेळतांना हात दुखवून घेतला आणि—

नानासाहेबांच्या सखोल दृष्टींतून त्यांची परस्परांशी संपर्क येतांच होणारी चलबिचल सुटली नव्हती, पण मानसशास्त्राच्या चिकित्सेनें त्याचे कारण मात्र त्यांना ठरवितां आलें नाहीं.

हें प्रकरण असे गुपचुप मिटावे हें विद्यार्थिनींपैकीं कांहींजणींना मुळींच आवडले नाहीं त्यांनीं याविषयीं दुर्गा डोंगरेला निरनिराळ्या प्रकारें छेडलें, पण तिनें आपलें मनाचें शिंपलें उघडलेंच नाहीं. आणि त्यांना फटकळ उत्तरें देऊन गप्प केले. तेव्हां त्यांनीं बापू टकलेला गोत्यांत आणण्याचा कट रचला. एका विद्यार्थिनीनें आपल्या शाळेंत शिकणाऱ्या बहिणीच्या हस्ताक्षरांत वत्सला कुळकर्णी या सहीनें त्याला

पत्र लिहिले कीं, "मला तुमच्याशीं दुर्गा डोंगरेसंबंधीं कांहीं विशेष बोलायचे आहे. तरी अमुक दिवशीं अमुक वेळीं लेडीज रूममध्यें या म्हणजे तेथें कोणी नसेल." "तो तेथें आला कीं त्याच्या विरुद्ध गिल्ला करावा असा त्यांचा बेत होता. पण तो फसला; कारण तो आलाच नाहीं. वत्सला कुळकर्णी या नांवाची कुणी विद्यार्थिनी कॉलेजांत आहे याचा त्याला शोध करूनहि, ऑफिसांतली सर्व राजेस्टरें चोरून पाहूनहि; ठाव लागला नाहीं. लेडीज रूमकडे नियोजित वेळीं फिरकण्याचेंही त्याला धैर्य झालें नाहीं. त्याला त्या वेळी ती खोली अगदीं रिकामी आढळली असती हें मात्र खरें.

आपला डाव फसला हें पाहून खट्टू झालेल्या विद्यार्थिनींच्या आपापसांतल्या चर्चेमुळें ही हकीगत दुर्गा डोंगरेच्या एका मैत्रिणीला कळली. आणि ती तिनें सहज दुर्गा डोंगरेला सांगितली. तिनें लगेच त्या पत्र लिहिणाऱ्या शाळेंतल्या मुलीला गांठून आणि भाकदपटशा दाखवून वत्सला कुळकर्णीच्या सहीनें आणखी दोन पत्रें लिहून घेतली. एक बापू टकलेला लिहिले होते कीं, "मी ठरल्या वेळीं तुमची लेडीज रूममध्यें वाट पाहिली पण तुम्ही आला नाहीं. हें चांगले केले नाहीं. आतां तरी अमुक दिवशीं संध्याकाळीं सहा वाजतां कॉलेजमागील टेकडीवरील कातळावर या. तेथें तुम्हाला दुर्गा डोंगरेसंबंधीं अत्यंत महत्त्वाचें असें कांहीं गुपित सांगायचें आहे," दुसरें पत्र तिनें आपल्या नांवाचें लिहून घेतले त्यांत तिला स्वतःला त्याच वेळीं व त्याच स्थळीं अशाच कारणासाठीं बोलविलें होतें.

या जाळ्यांत मात्र बापू टकले नेमका आडकला. दुर्गा डोंगरेविषयीं गुपित हें आमिष इतकें गोड Irresistible होतें हें त्यानें कधींहि कबूल केले नसतें. पण कॉलेजमागील टेकडीवर फिरायला जाणें मुळी धोक्याचें, असें त्याला वाटण्याचें कांहीं कारण नव्हते.

नियोजित वेळीं तो कातळावर गेला. तेथें कुणी नव्हतें. कड्या-

वर बसून त्यानें सभोवार दूरवर न्याहळून पाहिले. त्याची छाती धड-धडत होती हेंहि त्यानें कधीं कबूल केलें नसतें. त्याच्या मागच्या बाजूनें दुर्गा डोंगरे अगदीं जवळ येऊन पोंचली तरी त्याला कळलेंच नाहीं. ती गोंधळलेलीच होती पण संभावितपणें आपल्याशीच म्हणाली–

" अय्या, इथं तर कुणी तरी बसलय् ! "

" आय् अम् सॉरी," तो वळून म्हणाला. " तुमची ही नेहमींची बसायचीं जागा वाटतं ?"

" छे छे, तसं मुळींच नाहीं. आजच पहिल्यानें आलें म्हटलं तरी चालेल. एका माणसाला भेटण्याच्या संकेतानें पण–' तिनें त्याच्या शेजारी बसत म्हटले.

" हवं असलेलं मनुष्य न भेटतां नको असलेलंच भेटलं."

" असंच कांहीं नाहीं. पण अपेक्षित माणसाऐवजी अनपेक्षित माणूस भेटलं. वत्सला कुळकर्णी नांवाच्या एका मुलीला भेटायला मी इथें आलें होतें."

" काय ! वत्सला कुळकर्णी ?"

" कां ? तिची तुमची विशेष जानपछान आहे वाटतं ? तिचीच वाट पाहत इथें बसला होता का ? "

" होय, पण मी तिला अजून पाहिलंदेखील नाहीं. पण तुम्ही या वेळीं इथें याल अशी तुमच्या मैत्रिणीला कल्पना नसावी."

" मैत्रीण ? मला तर ती कोण काय हें माहीतदेखील नाहीं; पण तिच्या या पत्रावरून मी येथें आलें " असें म्हणून तिनें आपल्याजवळचे पत्र त्याच्या हातीं दिलें आणि म्हटलें:–ती तुमच्याबद्दल काय विशेष मला सांगणार आहे आणि ते कां याची मला कांहींच कल्पना नाहीं."

बापू टकलेनें तें पत्र वाचून पाहिलें. आणि " अशींच दोन पत्रें तिचीं मलाही आलीं." असें म्हणून त्यानें आपल्या जवळचीं पत्रें तिला

दिली. तिनें त्यांच्यावरून नजर फिरविली आणि कांहीं वेळ विचार केल्यासारखें करून म्हटलें, "ही मुलगी कोण असेल याचा कांहीं अंदाज?"

"कांहीं नाहीं, ती आपल्या कॉलेजांतली तर नाहीं."

"अशीं पत्रें लिहिण्यांत तिचा हेतु तरी काय?"

बापू टकलेला कुठें काय माहीत होतें, तो काय सांगणार!

"आणि आतां अंधार पडत आला तरी ती आली नाहीं. तेव्हां न येण्यांत तरी तिचा हेतु काय?" तिनें आपल्या हातांतील घड्याळाकडे पाहून म्हटलें. तो तिच्याकडे नुसता बघतच राहिला.

"पण बरं झालं. माझ्यामुळें तुम्हांला झालेल्या त्रासाबद्दल क्षमा मागायची मला संधि मिळाली." असें म्हणत म्हणत तिनें तीं तिन्ही पत्रें आपल्या व्हॅनिटी बॅगमध्यें कोंबलीं. तिला आडवण्यासाठीं तिच्या हाताच्या अगदीं जवळ त्याचा हात गेला. चटकन् मागें सरून त्यानें म्हटलें :–

"छे: छे: मीच क्षमा मागायला हवी होती. पण मला कधींही इतकें धैर्य झालं नाहीं. मला अगदीं मवाली ठरवलं असेल तुम्ही मनानं!"

ती बराच वेळ कांहींच बोलली नाहीं. तो काय बोलावें या विचारांतच मूक राहिला. कांहीं वेळानें तीच म्हणाली, "ही वत्सला कुलकर्णी कोण आहे तिची वाट पहाण्यांत कांहीं अर्थ आहे कां?" त्याला गुदमरल्यासारखें झालें होते, त्या टेकडीवरच्या मोकळ्या हवेंत देखील! आपण फार जवळ बसलों अशी त्याला जाणीव होती.

"पण तुम्ही तिचा कसून शोध घेऊन मला सांगाल का?"

चंद्रावरचं हरीण धरून आणणं याहून अवघड नव्हतं.

"बरं ऽ बाय् बाय्! नाहींतर परत जायला उशीर होईल"

"अय्या खरंच कीं! पण आपली भेट कुठं आणि कशी होणार?"

या वेळीं तिनें असा कांहीं अंगविक्षेप केला कीं तो टकमक बघतच राहिला.

" इथंच आणि याच वेळीं. पण उद्यां नाहीं जमायचं हं ! परवां-परवां नक्की बरं कां ? बाय् बाय् " असें म्हणत ती निघून देखील गेली. आणि तो कितीतरी वेळ तिथें तसाच बसून होता.

× × × ×

कांहीं दिवसांनीं कॉलेजांतील एक तरुण प्राध्यापक नानासाहेबांना सहज म्हणाले:–

" बापू टकले आणि दुर्गा डोंगरे यांची गट्टी झालेली दिसते."

" ती कशी ?"

" दोघं मिळून अलीकडे टेकडीवर फिरायला आलेली वारंवार दिसतात."

" अस्सं ? "

" आणि रात्र पडेतों कातळावर बसतात."

" दुसऱ्या कोणी हें मला सांगितलं असतं तर मी विश्वासदेखील ठेवला नसता."

आणि त्यानंतर उभयतांच्या वागणुकीवर बारीक नजर ठेवूनहि त्यांना तसें कांहीं आढळलें नाहीं.

आणखी कांहीं दिवस गेले, दिवाळी येऊन गेली. गॅदरिंग पार पडलें. परीक्षेचे फॉर्म भरले गेले. रेसिडेन्सींतील दिवे जास्त वेळ राहूं लागले. एका विद्यार्थिनीनें मधल्या सुट्टींत लेडीज रूममध्यें जाहीर केलें,

" ए ऽ ऐकलंत का ! दुर्गा डोंगरेचं म्हणे जुळलं !"

" काय ग ? कुठें ? कोण ? "

" बापू टकले "

"छट्! तिच्या गैरहजेरींत तिची अशी नालस्ती करूं नकोस." दुसऱ्या एका विद्यार्थिनीनें तिला खोडून काढलें.

"बापू टकले वडील अत्यवस्थ म्हणून निघून गेला आहे आणि त्यानें फॉर्म देखील भरला नाहीं."

"बरं ऽ माझं बोलणं आपलं राहिलं ऽ"

पण इतर विद्यार्थिनींनीं दुर्गा डोंगरेला गांठून विचारलेंच.

"नॉनसेन्स" तिनें उत्तर दिलें.

परीक्षेच्या आधीं थोडे दिवस दुर्गा डोंगरे नानासाहेबांकडे आली आणि कॉलेज सोडून जातांना आशीर्वाद मागूं लागली.

"कॉलेज सोडून जाणार? कां आणि परीक्षा?"

"सध्या राहित"

"कारण?"

"बापू टकलेच्या वडिलांना अर्धांग झालें आहे. घरचें बघण्या-साठीं त्याला शिक्षण सोडावें लागणार.

"मग?"

"त्याचें लग्न आपल्या डोळ्यांसमोर व्हावें अशी त्याच्या वडि-लांची शेवटची इच्छा आहे.

"असेल, पण तूं इतका अभ्यास केलेला आणि परीक्षा अगदीं जवळ आलेली"

"होय, पण मला गेलंच पाहिजे."

"एवढी परीक्षा देऊन जा, फार दिवस नाहींत."

"पण मी त्याच्याशिवाय आतां राहूं शकत नाहीं."

नानासाहेबांनीं तिला आशीर्वाद दिला आणि ती निघून गेली. आपला पराभव झाला असें सारखें त्यांना वाटत होतें. किती तरी वेळ ते विचार करीत होते, प्रसंग आठवीत होते, गणित करीत होते. मनाचें मोजमाप, आणि नियम, आणि अंदाजअडाखे कशालाच कांहीं ताळमेळ नाहीं. तींच तींच कूटें त्यांनीं पुन्हापुन्हां सोडवून पाहिलीं. पण उत्तरें चूकच येऊं लागलीं. त्यांनीं कपाटांतल्या जुंग, ॲडलर, फ्राईड इत्यादींकडे एक साभिप्राय नजर टाकली व ते खिडकींत येऊन उभे राहिले. कॉलेजांतून सुटलेल्या मुलामुलींचा मोठा समुदाय त्यांना दिसला. इतकीं विविध मनें आणि त्यांत विविध व्यापार. अभ्यासाला असंख्य विषय. आणि त्याला मोजमाप नाहीं, नियम नाहीं, गणित नाहीं.

---

# मांजरीचीं पिलें

"हे बगा माऊ, कतय् पांडलं पांडलं ? छानय् किनई !"

एके दिवशीं घरीं येतांच मिनीनें एक लहान मांजराचें पिल्लूं मजपुढें धरलें. किती गोजिरवाणें! पांढरें शुभ्र, पिंजलेल्या कापसासारखे मऊ मऊ केश, घारे घारे डोळे, "म्यायु म्यायु" करीत ते तिच्या हातून सुटण्यासाठीं धडपडत होतें.

"आगाशांच्या आजोबांनीं दिलय्. आपल्या घली लाहनाल आहे ते–ऽ"

दुपारीं मिनी आपल्या आईबरोबर आगाशांच्याकडे गेली होती. तेथें तिनें तें पाहिलें आणि घरीं नेण्याचा हट्ट धरला. आगाशांच्या आजोबांनीं मोठ्या आनंदानें तें तिला देऊन टाकलें. इतकेंच नव्हे तर उपरण्यांत गुंडाळून तिच्याबरोबर येऊन घरीं आणून सोडलें.

"कशं छान् आहे! बशींतून दूध पितं अन् उडी पन् मालतं किती छान्- टुणकन् अश्शी ऽ- पन आई म्हनते पलत आगाशांनां दिऊन टाकायचं. ल्हाऊदे नाह्यो ते ? आगाशांचे आजोबा पन् म्हणाले, -ल्हाऊ दे हो, माझ्या पांगलुनांत कशं छान झोंपतय—"

आणि तें मांजराचं पिल्लूं घरांत राहिलें. बशीतनं दूध पिऊन आणि मिनीच्या पांघरुणांत झोंपून वाढलं. पहिल्यानं किडे, नंतर झुरळ आणि नंतर उंदीर मारूं लागलं. आळींतील घरांच्या छपरांवरून फिरूं लागलं आणि जेवणाच्या वेळीं दूधभातासाठीं नेमकं येऊं लागलं. ती मांजरी आहे असें कळून येतांच तिचें नांव निमी असें ठेवण्यांत आलें. मिनीला चिडविण्यासठीं तें नांव तिच्या आईनें सुचाविलें. पण तिला तें आपलें आवडलें. निमी मोठी झाली आणि घरांत राहेनाशी झाली- चहाच्या वेळीं दुधासाठीं कडमडे. जेवणाच्या वेळीं दूधभातासाठीं हजर राही आणि अशीच केव्हांतरी दिसे.

आणि बोक्यांची जा-येही आमच्या छपरांवरून जास्त सुरू झाली. कांहीं दिवसांनीं 'म्यांव गुर्रई-' यांनीं रात्रीं आमची झोंपमोड व्हायला लागली. आणखी कांहीं दिवस गेले. निमीची चपळाई कमी झाली आणि ती घरांत निवाऱ्याच्या जागा शोधूं लागली.

एक बोका अलीकडे आमच्या छपरावरून फार जाऊं येऊं लागला. कधीं कधीं तो घरांतूनही हिंडून जाई. कुणीतरी त्याला हुसकून लावी. आणि सावधपणें तो निसटून पळून जाई.

त्याचा रंग पिवळा होता. वाघासारखे त्याच्या अंगावर पट्टे होते. त्याचा जबडा रुंद होता. दिसायलाही तो मोठा क्रूर दिसे. अंगणांतील पाठभिंतीवर बसून तो सर्व घरांत नीट न्यहाळून वारंवार पाही. कोणी हुसकून दिल्याशिवाय जात नसे.

एके दिवशीं मिनी धांवत धांवत सांगत आलीः- "आई, आपल्या निमीला पिलं झालीत्. माळवंचावर ठेवलीत तिनं. चल की बघायला."

" आपण त्या पिल्लांना हात लावूं नये बरं. नाहींतर मांजरी त्या पिलांना पाजणार नाहीं " मिनीच्या आईनें तिला सांगितलें.

पण मिनी वारंवार जाऊन त्या नवजात जीवांनां पाहून आल्याशिवाय रहात नसे.

" दोन पिल्लें आहेत, अगदीं लहान आहेत, डोळे अजून उघडले नाहींत. पांढरीं आहेत, पण त्यावर पिवळे डाग आहेत. बघ की कशी ' म्याऊ म्याऊ ' करताहेत—" इत्यादि वर्णनें तिची चालूच होती.

दुसरें दिवशीं मिनी येऊन सांगू लागली- " एकच पिल्लं आहे गं आई. दुसरं कुठं गेलं कीं !"

" मांजरी आपल्या पिल्लांची सात ठिकाणीं जागा बदलते, तिनंच कुठं तरी नेऊन ठेवलं असेल." आईनें म्हटले.

पण दुसरें पिल्लूं पुन्हां दिसलेंच नाहीं. एकच पिल्लूं मिनीनं नंतर कणगीमागें, फडताळावर, वळचणीखालीं, कडब्याआड, सरपणामध्यें असें लपवून वाढविलें. आणि हळूहळू ते सगळ्या घरांत फिरूंहि लागलें. मिनी त्याला खेळविण्यांत मोठी रंगून जाई. रबराचा लहान चेंडू त्याच्यापुढें फेकला म्हणजे ते धरायला धांवे, टेबलक्लॉथला धरून लोंबकळे, घडवंचीवरील वळकट्यांवर चढून उड्या मारी.

एके दिवशीं दुपारीं व्हरांड्यांत असे आम्ही बसलों होतों. तें पिल्लूंही तेथें खेळत होतें. मांजरी चहाच्या वेळी दूध पिऊन शिकारीला निघून गेली होती. अंगणांतील पाठभिंतीवर तो बोका केव्हां येऊन बसला याकडे आमचें कुणाचेंहि लक्ष नव्हतें. पाहतां पाहतां त्यानें येऊन त्या पिल्लावर झडप घातली आणि त्याला तोंडांत धरून छपरावर उडी मारली. त्याच्यामागं धावण्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. तो सांपडला नाहीं. शोध करतां पलीकडच्या एका घराच्या परसांत झाडाखालीं ते पिल्लूं मरून पडल्याचें दिसून आलें.

आम्हां सर्वांना फार वाईट वाटलें. मिनीच्या आईला अतिशय वाईट वाटले. मिनीनें तर त्या बोक्याची एक प्रकारें भितीच घेतली. संध्याकाळीं निमी येऊन 'म्यँव् म्यॉव्' अशा केविलवाण्या हांका मारीत सगळया घरांत हिंडू लागली दूधभात तिनें खाल्ला नाहीं. कितीतरी दिवस ती सारखी घराच्या कोपऱ्याकोपऱ्यांत शोधत 'म्यॉव् म्यँव्' अशा आर्त हांका मारीत आपल्या पिल्लाला बोलावीत होती.

कांहीं दिवस तो पिवळा बोका पुन्हां दिसला नाहीं. पण एके दिवशीं खोलींत माझ्या पायाशी बसलेली निमी त्वेषानें अंगणांत धांवत गेली तिच्या मागोमाग जाऊन पाहिलें तर तो बोका भितीवरून छपरावर उडी मारून पळून जातांना दिसला.

नंतर बहुधा निमी घरांत नसतांना तो त्या भिंतीवर येऊन बसे. मिनी त्याला पाहतांच ओरडे– "तो बघा आला मेला!" आणि मग कुणीतरी त्याला मारायला धांवतांच तो उडी मारून पळून जाई.

कांहीं महिने गेले. मिनी पास होऊन वरच्या वर्गांत गेली. तिच्या मामानें पेढयासाठीं खवा पाठविला होता. त्यांतला पहिल्यानें तिनें निमीला दिला. त्यावेळीं तो बोका भिंतीवर बसलेला होता. मिनीचें सहज लक्ष्य गेलें आणि ती ओरडली, "तो बघा आला मेला" पण ती कांठी आणायला आंत गेली. इतक्यांत निमी उडी टाकून भिंतीवर त्याच्या जवळ गेली. आणि तीं दोघेही पसार झालीं.

कांहीं दिवसांनी मांजरांची भांडणें छपरावर पुन्हां सुरू झालीं. "म्यॉव् गुर्रर्र" यांनीं रात्रीं आमची झोंपमोड होऊ लागली. आणखी कांहीं दिवस गेले. निमी पुन्हां आळसावलेली दिसूं लागली. आता ती निवाऱ्याच्या जागा शोधण्याऐवजीं घरांतल्या माणसांच्या भोंवती भोंवती राहूं लागली. बहुतेक ती माझ्या बैठकींतच असे. लहानपणीं ती माझ्या टेबलावर, बुकशेल्फखाली आणि फाईलसच्या कपाटामध्यें कडमडत असे. आतां मोठेपणीं ती कोचावर स्वस्थ पडून राहूं लागली.

मिनीची आई मला मिस्किलपणें म्हणाली, "निमी या खेपेला तुमच्याकडून करून घेणार बरं का बाळंतपण!"

आणि एके दिवशीं मी कपाटाचे दार उघडले तों खरंच ती आपल्या दोन पिल्लांसह त्यांत फाईल्समध्यें बसलेली! दार उघडतांच ती उडी टाकून बाहेर गेली. कपाटाचे दार मी नेहमीं बंद करीत नसे, पुष्कळदां नुसतें पुढें केलेलें असें. वारंवार फाईल्स काढण्यासाठीं उघडावें लागे. बंद असतांहि आंत हवा भरपूर खेळण्याची सोय होती. किती वेळ ती आंत होती कोण जाणे?

फाइली हलकेच वरच्या कप्प्यांत ठेवून मला खालचा कप्पा तिच्या पिल्लांसाठीं रिकामा करावा लागला आणि दार पुढें करून ठेवावें लागलें.

दोन्ही पिल्लें अगदीं पांढरीं शुभ्र लोण्यासारखीं होतीं. एकाच्या कपाळावर गंधासारखा पिवळा डाग होता. आणि दुसऱ्याच्या गळयाखालीं पायांमधून पोटापर्यंत काळी रेघ होती. निमीनें आपलीं पिल्लें दुसरीकडे हलवलींच नाहींत. तिथेंच तीं दिवसेंदिवस वाढूं लागलीं. डोळे उघडून हलुहळूं फिरूं लागलीं. म्यॅऊं म्यॅऊं करूं लागलीं आणि कपाटांतून बाहेर येऊं लागलीं. मिनीला तीं पिल्लें पाहून कितीतरी आनंद झाला.

पण तिसरेच दिवशी तिनें त्या बोक्याला भिंतीवर पाहिलें आणि ती घाबरून ओरडली– "तो बघा आला मेला!" आणि त्यानंतर कपाटाचे दार बंद ठेवण्याची दक्षता आम्ही घेऊं लागलों. निमी बाहेरून आली म्हणजे तिच्यासाठीं ते उघडायचे आणि ती गेली म्हणजे बंद करायचे. हें एक आगाऊ कामच झालें.

तो बोका रोज अनेक वेळां येऊं लागला. आणि सगळया घरांत सावधपणें चाहूल घेत फिरूं लागला. दिसला कीं सर्वांनी त्याला मारायला धावायचें आणि त्यानें निसटून पळून जायचें, असें चाललें होतें.

एकदां तर तो त्या कपाटाजवळच कोचावर बसलेला आढळला. सुदैवानें दार बंद होतें आणि पिल्लें आंत सुरक्षित होतीं.

पुन्हां तो बोका आलेला दिसला कीं त्याला गोळी घालायची असें मी ठरविलें. हा विचार मी मिनीच्या आईला सांगितला, पण तिनें त्याला कसून विरोध केला. पिल्लांना वाचवायला याशिवाय दुसरा मार्ग नाहीं असो मी तिला पुष्कळ प्रकारें समजावलें पण तिनें म्हटलें:- " मांजर मारण्यासारखं दुसरं पाप नाहीं."

पापपुण्याचें काय असेल तें असो; पण मी आपली शॉटगन भरून ठेवली आणि तिचा उपयोग करण्याचा प्रसंगहि लगेच आला. दुपारची वेळ, मिनी शाळेला गेली होती. तिची आई नुकतेंच काम संपवून पलंगावर येऊन बसली होती. मी बाहेर जाण्यासाठीं कपडे करीत होतों इतक्यांत समोर कोणी नाहीं असें पाहून तो बोका चोर-पावलानीं बैठकींत शिरू लागला. मी लगेच आपली बंदूक त्याच्यावर रोखली आणि ती आतां झाडणार, इतक्यांत मिनीच्या आईनें मला मागें ओढलें. नेम चुकला, बोका सावध होऊन पळाला. आणि मिनीच्या आईनें म्हटलें:–" शपथ आहे तुम्हांला मांजर माराल तर." बरीच बोलाचाली झाली. रुसणें, रागावणें, रडणें, समजावणें झालें; पण शेवटीं " पुन्हां मांजरावर बंदूक चालविणार नाहीं." असें मी तिला वचन दिलें.

कांहीं दिवस तो बोका दिसला नाहीं, पण पिल्लांना मात्र आम्ही डोळयांत तेल घालून जपण्याचें ठरविलें. तीं पिल्लें मोठीं झालीं तशी कपाटांत राहीनात. घरांत फिरण्यासाठीं धावूं धडपडूं लागलीं. बैठकीचें दार बंद करावें. आणि तिथेंच त्यांना खेळूं द्यावें. आपण समोर नस-तांना कपाटांत बंद करून ठेवावें असें चालविलें. मिनी एखादा उंदीर धरून आणून त्यांच्यापुढें टाकी, त्यांच्या हांतून निसटून तो पळूं लागला

म्हणजे झडप घालून पुन्हां पकडून आणी, असे चाले. ती बाहेर जाऊं लागली कीं तिच्या मागोमाग जाण्यासाठीं तीं धांवत.

पुन्हां तो बोका येऊं लागला, सावधपणें न्याहाळूं लागला, चोरपावलीं फिरूं लागला, हिंस्रपणें वास घेऊं लागला. याचा कांहीं तरी प्रतिकार करणें भागच होतें. आपण दबा धरून बसावें आणि एकदां त्याला चांगली अद्दल घडवावी असें मनांत आलें आणि संधीहि लगेच आली.

असाच संध्याकाळीं तो चोरपावली घरांत फिरत असतां एकदम धांवून जाऊन त्याला मी काठी मारली. भिंतीवर झेंप घेत असतां त्याला ती वर्मी लागली. आणि तो अंगणांत बेशुद्ध पडला. त्याचा तो रुंद जबडा, निळे डोळे, मस्त शरीर, आणि क्रूर मुद्रा जवळून पाहतां आली. मिनी खेळायला गेली होती. तिची आई देवाला गेली होती. मी पाणी आणून त्याच्या तोंडावर ओतले. तो सावध होण्याचे चिन्ह दिसेना. मार चांगलाच वर्मी लागला होता. कांहीं असो, तो मरूं नये, असें वाटूं लागलें. त्याला उचलून दाराबाहेर ठेवलें. त्याच्यावर पुष्कळसें पाणी ओतलें, वारा घातला, सुचले ते उपाय केले.

अर्ध्या तासानें तो चलनवलन करूं लागला. मला बरें वाटलें. हा आतां मरत नाहीं अशी खात्री होऊन मी बाहेर निघून गेलों. "तो मेला असता तर?" याची हुरहुर मात्र मनाला लागून राहिली. परत आलों तेव्हां तो ठेवल्या ठिकाणीं नव्हता.

पुन्हां तो आपल्या घरांत येणार नाहीं ही अपेक्षा मात्र फोल ठरली. कांहीं दिवसांनीं पुन्हा तो आलाच. तेंच सावधपणें न्याहाळणें, चोरपावलीं फिरणें, हिंस्रपणें वास घेणें.—

एके दिवशीं रात्रीं आम्ही जेवायला बसलों असतांना पिल्लांचें आर्त ओरडणें कानावर आलें. मिनी बाहेर गेलेली मी पाहिली होती. पिल्लें असलेल्या कपाटाचें दार उघडें तर नाहीं हे पहायला मिनीला

सांगितलें. मिनीनें परत येऊन सांगितलें, "उघडे होतें, पण मी बंद करून आलें."

पण त्या केवीलवाण्या ओरडण्यानें माझें मन अस्वस्थ झालें होतें जेवण आटोपतांच मी बैठकींत जाऊन लाईट लावला आणि कपाटाचें दार उघडलें तोंच तो बोका उडी टाकून पळून गेला. माझ्या पोटांत धस्स झालें. पाहिलें तर दोन्ही पिल्लांच्या माना चावून टाकलेल्या होत्या. ती पांढरी शुभ्र गोजिरवाणी पिल्लें रक्तानें माखलीं होतीं. मला तें दृश्य पाहवेना. गड्याला बोलावून मी ताबडतोब ती उचलून न्यायला सांगितलें. बोका कपाटांत शिरल्यानंतर मिमीनें जाऊन दार लावलें. त्यामुळें त्या बिचाऱ्यांना पळून जाऊन जीव वांचाविणेंहि अशक्य झालें.

मला आतोनात वाईट वाटलें. दुसरें दिवशीं निमी 'म्यॉंव् म्यॉंव्' अशा केवीलवाण्या हाका मारीत घरांत हिंडूं लागली. पुन्हा पुन्हा त्या रिकाम्या कपाटांत येऊन शोधूं लागली. आणि दीनवाणें सर्वांच्या चेहऱ्यांकडे पाहूं लागली. भ्यालेल्या मिनीचा चेहरा अगदीं गोरामोरा असा पाहून तिच्या आईला तिची काळजी वाटूं लागली.

पण मिनी लवकरच सगळें विसरून हंसूं खेळूं लागली. माझ्या मनाला मात्र चांगला चटका लागून राहिला. मांजरीच्या पिल्लांचें संरक्षण आपण करूं जाण्यांत आपली चूक तर झाली नाहीं? मारलेल्या बोक्याला आपण पुन्हां वांचविण्याची खटपट केली ती कां? आपली अहिंसावृत्तीच दोन वेळां हिंसेला कारण झाली कां? आपलें कुठें चुकलें?

आणखी कांहीं दिवसांनीं निमी आपलें दुःख विसरून जाईल. पुन्हां बोक्यामागें धांवत जाईल, पुन्हां तिला पिल्लें होतील. पुन्हां त्याच बोक्यापासून त्यांचें रक्षण कसें करावें ही विवंचना उभी राहील.

दिवसानुदिवस मी विचार करीत राहिलों. निमीला कुठें तरी दूर नेऊन सोडून द्यावें, तिच्या पिल्लांची जबाबदारी निसर्गावर सोंपवून

मोकळे व्हावें, हा एकच उपाय माझें मन मला सारखें सुचवीत राहिलें. मिनीच्या आईला तो मी सांगितला. तिला तो पटेना. सहवासानें तिलाहि त्या मांजरीचा लळा लागला होता. निमी होतीहि तशी गुणी आणि गोंडस. दुभत्याचें कपाट उघडें असलें तरी ती कशांत तोंड घालीत नसे, अगदीं विश्वासानें घरांत वावरे. उंदीर तर ती आल्यापासून कधीं घरांत दिसलाच नाहीं.

मिनीला नकळत आमची ही भाषा झाली. ती शाळेंतून आली कीं निमी शेपुट फुगवून तिच्या पायाला अंग घासल्याशिवाय कधीं रहात नसे. सकाळीं ती उठण्यापूर्वी तिच्या पायाशीं पांघरुणांत बसून राही आणि चहाच्या वेळीं दूध मिळेपर्यंत तिच्या मागेंमागें फिरत राही. ती दिसली नाहींतर मिनी लगेच अस्वस्थ होई आणि म्हणे:—"आई, निमी कुठं दिसत नाहीं ग ?"

एके दिवशीं आम्ही आपला निश्चय अमलांत आणला. ऑफिसच्या शिपायानें तिला दूर गांवाबाहेर नेऊन सोडले आणि परस्पर तो आपल्या घरीं गेला. तिला नेतांना मिनीच्या आईच्या डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा वाहिल्या. मिनीनें शाळेंतून येतांच विचारलें:–" निमी कुठं आहे ग आई ?"

आई कांहीच बोलली नाहीं. दुसरे दिवशीं ती शेजारी-पाजारी शोधून आली. आज येईल उद्यां येईल या आशेवर ती राहिली.

मिनीच्या बालहट्टानें निमी आमच्या घरीं आली ती जीवनाच्या तत्त्वज्ञानाचा कांहीं धडा देण्यासाठीं कां ? आपल्या रोमारोमांत भिनलेल्या अहिंसेनें आपल्या हातून जें शेवटी करविलें ती हिंसा तर नाहीं ? आपलें चुकलें का ? का बरोबर आहे ! कोडें उलगडलें नाहीं म्हणजे कालांतरानें आपण त्याचा नाद सोडून देतों; पण मनाची हुरहूर शिल्लक राहतेच.

---

## चंदा आणि कमोदा

('जे जे विभूतिमत्, श्रीमत्, ऊर्जस्वी-किंवा तेजस्वी चमकदार, बाणेदार- आहे ते ईश्वरी अंशच आहे.' असें एक वचन आहे. एका इंग्रज अधिकाऱ्यानें ही या नर्तकीची हकीकत नोंदवून ठेवलेली माझ्या पाहण्यांत आली. त्यांत टिपलेल्या ऐतिहासिक सत्याच्या बंधनांतच लोकांच्या दृष्टीनें सुखैक विषय पण वस्तुतः सर्वसंगपरित्यागपूर्वक कलेच्या माध्यमांतून ईश्वराच्या एकनिष्ठ उपासनेचा जन्मजात धर्म आमरण पाळण्याचा कटाक्ष ठेवणारी एक देवदासी इथें कथाविषय झाली आहे. चिखलांत उगवलेल्या कमळाची जीवननिष्ठा लक्ष्मीचें आसन होण्याची आहे. जशीच्या तशी दाखविली आहे. तंत्र आणि संकेत यांची तमा न बाळगतां- )

"थक् थै; थक् थै, थक थै!"

साथीनें समेवर थाप मारली आणि प्रत्येकाच्या तोंडून उद्गार निघाले:– " वाहवा ! "

चारामिनारच्या ईशान्येकडील अंजनीच्या महालांत हा जलसा ऐन रंगांत आला होता. राज्यांतले निवडक अमीरउमराव तेथें जमलें होते, स्वतः नबाबांची खासा स्वारी तेथें होती आणि त्यांच्याहि तोंडून उद्गार निघाले होते:– " वाहवा ! "

नेहमींचा दरबारी नाचगाण्याचा हा जलसा नव्हता. याचें स्वरूप अगदीं वेगळें होतें. एखाद्या देवळाच्या सभामंडपासारख्या त्या दिवाण-खान्यांत मेहरपीतील नटराजाच्या मूर्तीसमोर समया जळत होत्या. उजव्या बाजूला उच्चासनावर नवाब होते, दोन्ही तरफा सरदार आद-बीनें बसले होते. ज्यांना बसण्याचा अधिकार नव्हता असे लोक मागें हात बांधून उभे होते.

नर्तकीनें मृदंग वाजविणाऱ्या वयस्क व्यक्तीला फक्त अभिवादन केलें आणि ती त्याच्यामागें असलेल्या चिकाच्या पडद्याच्या दारांतून निघून गेली. सर्वजण स्तंभित झाले कीं, " नवाबांच्या उपस्थितींत त्यांना मुजरा नाहीं असें कसें ? " पण कुणी कांहीं बोललें नाहीं.

वीणेचा स्वरहि थांबला नव्हता; मृदंगाचे बोलहि थांबले नव्हते; सूक्ष्म खर्जांत आलाप घेतले जात होते आणि अस्पष्ट बोल नाजुक प्रतिध्वनि उमटवीत होते. सगळे वातावरण स्वर आणि लय यांच्या संगतीनें भरून गेले होते. देवापुढील धूपांचा सुगंध त्यांत दरवळत होता. आणि लोकांच्या अंगच्या अत्तरांचाहि.

इतक्यांत ती नर्तकी पुन्हां बाहेर आली. दुसऱ्या एका शृंगार-लेल्या तरुणीला हाताला धरून घेऊन आली. असंख्य शमादानांतील दीपांनीं आपला प्रकाश तिच्या लाजऱ्या मुखावर टाकला आणि सगळे डोळे तिथें खिळून राहिले.

वाद्यांच्या सुरावटींनीं आपला स्वर वाढविला; मृदंगावर चपखल बोल घुमूं लागले; आणि दोघींच्या पायांतील पैंजणांनीं "छुम् छुम छननन" असे ताल, काल आणि सम यांचे ठेके दाखविले.

हाव, भाव, मुद्रा, अंगविक्षेप, करन्यास, यांनीं विस्तारल्या जाणाऱ्या नर्तकीच्या त्या लास्यनृत्याच्या अलौकिक कलाकृतींतीला सौंदर्य,काठिन्य, आणि अचूकपणा याची पुरेपूर जाणीव होत असूनही आणि 'वाहवा' अशा उद्गारांनीं जमलेल्यांच्या माना सारख्या डोलत असूनही त्या दुसऱ्या नव्या लाजऱ्या नवतीवर खिळलेल्या नजरा तेथून फिरायला तयार नव्हत्या. पदन्यास, फिरत, आणि अंगविक्षेप यांनीं ती नृत्याला अचूक प्रतिवाद करीत होती, सर्वभर दृष्टिक्षेप करीत होती, पण तिचे लक्ष केंद्रित होते जिच्या बरोबर ती नाचत होती तिच्यावर. शेवटीं द्रुतगतीनें नृत्याचें अवसान दोघींच्या आवेगालिंगनात झालें तेव्हां श्रमबिंदू तिच्या निटिलावर चमकत होते.

वाद्यें विराम पावलीं. दोघींनीं मृदंग वाजविणाऱ्या वयस्कर व्यक्तीला फक्त अभिवादन केलें आणि त्या त्याच्या ओळीला मर्यादेनें जाऊन बसल्या.

पानसुपारी, हारतुरे, अत्तरगुलाब झाल्यानंतर नबाब जायला निघाले त्यावेळीं मात्र त्या दोघींनी त्यांना यथोचित अभिवादन केलें. प्रसन्न मुद्रेनें खासा स्वारी निघून गेली. आणि अमीर उमराव बुचकळ्यांत पडले कीं:– 'निगाह' रखो म्हणून चोपदारांकरवी ज्याच्या दरबारी मोठमोठयांचा अवमान होतो त्याला एक नर्तकी नृत्यसमयीं मुजरा देखील करीत नाही हें कसें?'

पण ठरावच तसा झाला होता. अगोदरच निश्चून केलेल्या कराराप्रमाणेंच या गोष्टी होत होत्या. चौमहल राजवाडयामागें असलेल्या कंचिन कचेरींत राज्यांतल्या सर्व नर्तकींनीं गायिकांनीं आणि गणिकांनीं हाजरी दिली पाहिजे असा हुकुम आणि रिवाज होता; आणि तसा

अम्मलही होत होता. पण चारामिनारच्या ईशान्येस अंजनी महालांत राहणाऱ्या चंदा नांवाच्या कंचनीस जेव्हां कंचिनकचेरींत येऊन हाजरी देण्याचा हुकुम झाला तेव्हां तिनें स्पष्ट कळाविलें की– 'मी कंचनी नाहीं, देवदासी आहे; दुसऱ्याच्या पुढें जाऊन मुजरा करण्याचा माझा धंदा नाहीं.'

हीच चंदा प्रतिवर्षीं फाल्गुनात पुण्याला 'राव राजेंद्र सवाई' यांच्या गणपति महालांत जाऊन नृत्यगायन करीत असे आणि वस्त्रें भूषणें घेऊन मोठ्या लवाजम्यानिशीं परत येई. नबाबांना याचा राग नव्हता असें नाही पण कांहीं इलाज नव्हता. पेशव्यांनीं दहा हजाराची शिबंदी खर्चासह तिच्या दिमतीला दिली होती.

भागानगरच्या ईशान्येस पांच कोसांवर एका लहानशा टेकडीवर पुरातनकाळी चंद्रमौलीश्वराचें देऊळ होतें. या देवळांतील देवदासीला जवळच टेकडीखाली पांच खेडीं इनाम होतीं. या देवाचा कार्तिकातील दीपोत्सव गोवळकोंडयाच्या किल्ल्यावरून पाहून कुतुबशहानें चौकशी केली. आणि अंजनी नांवाच्या तेथील देवदासीच्या नृत्य-गायन कौशल्यावर प्रसन्न होऊन चारामिनारच्या ईशान्येस अंजनीमहाल तिला बांधून दिला. कुतुबशाहीच्या अस्तानंतर देऊळ उध्वस्त झालें पण इनाम गांवें अंजनीच्या वारसांकडे राहिलीं.

चंदा आणि कमोदा ह्या दोघी बहिणी. चंदाला तिच्या आईनें लहानपणीच मदुरेजवळील एका खेडयांत राहणाऱ्या एका प्रसिद्ध नर्तकाकडे शिकायला ठेवले होते. ती वयांत येऊन आपल्या आईकडे राहायला आली तेव्हां कमोदा लहान सहा वर्षांची होती. चंदाच्या नृत्यगायन नैपुण्याची कीर्ती चहुंकडे पसरूं लागली त्यावेळीं कमोदाचे पद्मिनीचें सौंदर्य कलाकलानें विकसूं लागलें. कमोदाला तिची आई आणि बहीण फार जपत. ती ज्याच्या दृष्टीस पडे तो तिच्याकडे चित्रा-

सारखा पहात राही. चंदानें तिला आपल्याबरोबर नाचायला, गायला शिकविलें. पण त्यांत तिची फारशी प्रगति झाली नाहीं. चांदण्याप्रमाणें आल्हाद देणारे, मदिरेप्रमाणें उन्माद आणणारे आणि प्रभुतेप्रमाणें लोकांना आकर्षून घेणारे साधन निसर्गानेंच तिला दिलें होतें.

चंदाच्या नृत्यगायनानें लोक लुब्ध होत. तिनें कुणाच्याहि घरीं जाऊन कधीं मुजरा केला नाहीं. पण ते तिच्या घरीं येऊन तिच्या नटराजाच्या मूर्तीसमोर धनाच्या राशी रचीत. "देवदासीनें देवापुढेंच नृत्यगायन करावें." हा तिचा पण तिनें आपल्या गुरूच्या आज्ञेनें एकाच अपवादापुरता मोडला. तिच्या गुरूनें तिला सांगितलेः– "पेशवे हे देवांचा आणि देवळांचा मान राखणाऱ्या धर्मराज्याचे प्रधान आहेत, सत्वानिष्ठ ब्राह्मण व देवस्वरूप आहेत. तिथें तूं अवश्य जा. तुझा व्रतभंग होणार नाहीं." एखाद्या स्वारीवर निघालेल्या सेनापतीच्या इतमामानें, मेणापालखी, ललकार लवाजमा यांनिशी ती पेशव्यांच्या राजधानींतून परत आली कीं तिचा बोलबाला शहरभर होई.

कमोदा वयांत येऊन तिचें देवाशी लग्न झालें आणि तिच्या आईनें इहलोक सोडला. पतंगाप्रमाणें झडप घेणाऱ्या तरुण धनिकापासून तिच्या अजाण यौवनाचें रक्षण करणें चंदाला मोठें जोखमीचें ठरलें.

सर्व प्रकारचीं आमिषें निष्फळ ठरलीं. चंदा राजवाड्यांत कांहीं यायला तयार झाली नाहीं. आणि "अशी ही असामान्य नर्तकी आहे तरी कशी." हे जाणण्याची नवाबांची उत्सुकता शीगेला पोंचली तेव्हां त्यांनीं "खासा स्वारी तुझ्या घरीं येईल तेथें तूं आपलें कसब दाखव" असें बोलणें केलें.

"मी आपल्या घरीं देवापुढें सेवा करीन त्यावेळीं इतराप्रमाणें तुम्हीहि यावें पण मी तुम्हाला मुजरा करणार नाहीं." अशी अट तिनें घातली. ती मान्य करून नवाब आले आणि खुष होऊन गेले असेंच कांहीं नाहीं पण त्यांनीं भारी वस्त्रेभूषणें यांचीं भेट मात्र पाठविली.

नेहमींच्या नाचगाण्याच्या जलशाहून वेगळया अशा या पूजाविधीला दिवाणहि हजर होते. चंदा नायकिणीचा नृत्यगायनांतील कसबाबद्दल जसा साऱ्या दक्षिणेंत लौकिक पसरला होता तसा उत्तरेकडे त्यांच्या मुत्सद्दीपणाचा बोलबाला होता. उत्तरेकडे लोक भागानगरला त्यांच्या नांवानेंच ओळखीत. ते जातां जातां तिला म्हणालेः—

"चंदा, तूं आज बाजी मारलीस खरी; पण सगळे दिवस कांहीं सारखे नसतात."

त्या रात्रीं चंदाला झोंप कशी ती आली नाहीं. एका साध्या गोष्टीची रुखरुख तिला लागून राहिली. शृंगारलेल्या कमोदाला नृत्यासाठीं बाहेर आणतांना घाईघाईंत तिच्या गालाला काजळाचें गालबोट लावायला ती विसरली होती.

चंदाच्या अंगच्या गुणांची जादूच कांहीं और होती. नवाब वारंवार तिच्या घरीं येऊं लागले. आणि तिच्या सर्व अटी मान्य करून. आणि शेवटीं एकदां त्यांनीं तिला सांगितलें:— "तूं माझ्या जनानखान्यांत ये. राणी म्हणून मी तुझा स्वीकार करतों."

चंदानें उत्तर दिले :— 'मी देवाला वाहिलेली स्त्री आहे. देवासाठीं नृत्य आणि गायन करण्याचा माझा धर्म आहे. आमचें हें व्रत आमरण चालायचें असतें. पुण्य आहे त्यांत. मी आपला धर्म सोडायला तयार नाहीं.'

दुखावलेल्या स्वाभिमानानें त्यांनी तिचा नाद सोडला.

नानाविध प्रलोभनांनीं कमोदाला आपल्या राणीवशांत नेण्याची धडपड अनेकांनीं केली. तिचें सौंदर्यच तसें अद्वितीय होतें. चंदानें तिला आपला धर्म सोडू दिला नाहीं. कमोदा म्हणेः— 'काय होईल मी त्यांच्या घरीं गेलें तर!'

'देवाला पारखी होशील.'

'मला नृत्य आणि गायन तुझ्या इतकें चांगले येतच नाहीं.'

'म्हणून काय तूं घेतलेलें व्रत मोडणार? कुणालाहि आत्मसमर्पण न करणें हा आपला धर्म– आपण देवालाच स्वतःला वाहून घेतलेले आहे.'

पण कमोदाला काय झाले कोण जाणे. हळूहळू ती सुकूं लागली, कोमेजूं लागली. वैद्य हकीम, मंत्रतंत्र, गंडे दोरे, नवससायास, सर्व वांया गेले. आणि एके दिवशीं कमोदाचें आत्मार्पण पूर्ण झालें.

चंदा त्यानंतर अगदीं विरजून गेली. पण नृत्य गायन यांत शैथिल्य कधीं आलें नाहीं. एरवी उदास दिसणारी चंदा पैंजण बांधून उभी राहिली कीं भारल्यासारखी, संचार झाल्यासारखी तेजस्वी दिसे. तिच्या कसबाला नवनवे रंग भरत. आणि नृत्यावसानीं श्रांत, अबोल, आणि शून्यमनस्क अशी ती अंतर्गृहांत निघून जाई.

तिच्या मृत्यूनंतर तिची सर्व जिंदगी बेवारशी म्हणून सरकार जमा झाली. त्याचा हिशेब दिवाण नवाबांना सांगूं लागलें तेव्हां ते म्हणालेः– " जिने माझा आव्हेर केला. तिची एक कवडीहि मी घेणार नाहीं." तेव्हां त्या चतुर मुत्सद्यानें लगेच विनंती केलीः– असे आहे तर ही दौलत या सेवकाला देऊन टाकावी."

आणि तसेंच झालें. तिची स्थावर जंगम मालमत्ता दिवाणांच्या मोठ्या दौलतींत विलीन झाली. कुणींच आपला धर्म सोडला नाहीं. चतुर मुत्सद्यांनीं तर नाहींच नाहीं.

कालांतरानें पडून गेलेला अंजनीमहाल आतां रस्तारुंदीमुळें नाहींसा झाला आहे पण रात्रीच्या शांत वेळीं त्या जागीं गेले तर अजून असा भास झाल्यासारखा वाटतो कीं:– सूक्ष्म खर्जांत आलाप घेतले जात आहेत, मृदंगाचे बोल अस्पष्ट घुमत आहेत. सगळें वातावरण सौम्य सुगंधानें भरलें आहे; आणि पैंजणाच्या नाजुक आवाजांनीं " छुम् छुम् छननन " असे ताल, काल आणि सम यांचें ठेके दाखविले जात आहेत.

———

# अशीच एक सायंकाळ

तिन्ही सांजा होत आल्या. दिवस कसा गेला हें तिला कळलेंच नाहीं. घरकामांतच तो गेला. अलीकडे रोजच तो तसा जाई. राजाराणीचा संसार; काम तें काय असणार? पण अलीकडे काम करून सरत नव्हतें. उरकच पडत नव्हता कामाला. आणि त्याला कारण सहा महिन्याचा इवलासा बाळ!

रोज रात्रीं निजतांना ती निश्चय करी:- "उद्यां सकाळीं लवकर उठावें, बाळ उठण्यापूर्वीं बरेंच काम उरकावें, म्हणजे धांदल होणार नाहीं." पण जरा डोळा लागतो न लागतो तोंच बाळ जागा होई. पिवून पुन्हां झोंपण्याऐवजीं त्याला खेळत बसण्याची लहर येई. लाईट लावावाच लागे. दिव्याकडे पाहून तो हातपाय नाचवूं लागला, हंसूं खिदळूं लागला, म्हणजे ते कौतुक पाहण्यासाठीं "झोंप लागली का? पहावं कीं हें ध्यान कसं हंसतय् ते! हो ऽऽ"– असें म्हणून तिनें त्याला जागें करावें. एखादे दिवशीं बाळानें रडावें, किरकिर करावी,

जागावें आणि जागवावें आणि " हो ऽऽ याला जरा समजावा कीं ऽ"— म्हणून तिनें हलविले तरी त्यानें हूं म्हणून कुशीवर वळावें आणि झोंपून जावें असेंहि होई. आणि मग सकाळीं कुठली जाग यायला ?

कमीशनरचा पर्सनल म्हणून त्याला सकाळीं कामावर लवकर जावें लागे. आणि परत यायला किती उशीर होईल याचा नेम नसे. सकाळीं घाईघाईनें कांहीं तरी करून घालून त्याला कामावर पाठविल्यानंतर बाळाच्या जागण्याची, झोंपण्याची, रडण्याची, खेळण्याची, पिण्याची आणि अशींच इतर तंत्रे सांभाळून तिनें आपलें न्हाणेंधुणें, स्वैंपाक-जेवण, उष्टींखरकटीं, दूधदुभतें, निवडणेंटिपणें, आवरासावर इत्यादि करायचे म्हणजे सहजच संध्याकाळ व्हायची.

संध्याकाळीं मात्र तिला थोडी स्वस्थता मिळे. स्वतःची वेणीफणी व बाळाचे काजळ, तीट, कपडे करून ती त्याची वाट पाहत बसे. क्वचितच तो लवकर परत येई. आलाच तर चटकन् चहापाणी करून तीं दोघे बाळाला घेऊन फिरायला जात. पण बहुतेक तिची संध्या-काळची वेळ वाट पाहणें, कांहीं तरी विचार करणें, आठवणी काढणें व दारांत येरझारा घालणें यांतच जात असे. शेजारणी बोलायला सांपडत नसत. कारण त्यांच्या घरीं पुरुष परत आलेले असत.

अशीच ती आज वाट पहात बसलेली होती. आणि तिच्या दारीं एक गोसावी आला. जटांना उंबराचा चीक लावून त्याचे पेड वळलेले, सर्व अंगाला राख फासलेली; कमरेला चिंबळ्याचे कातडे गुंडाळलेले; कानांतील जड कड्यामुळें ते फाटून लोंबकळलेले; दोन्हीं कानांवर जळत्या उदबत्या अडकाविलेल्या; हातांतील चिमटा पावलें टाकतांना तालावर खळखळ वाजवीत तो आला. दारापुढें पावले मोजून टाकीत तो मागें पुढें फिरूं लागला आणि म्हणूं लागलाः— " जय अलख निरंजन ! माई भिक्षा."—

तिला त्याची भीतीच वाटली. पण त्यानें चटकन् जावें म्हणून

घरांतले तांदूळ आणून ती त्याला ते घालू लागली. तेव्हां तो म्हणाला:—
"माई, चावल नही मंगता, आटा देव, ईश्वर तेरा भला करे!" ती आंत गेली आणि तो दारासमोर फेऱ्या घालू लागला.

दुपटयावर उपडे वळून हातपाय आपटत बसलेल्या बाळाजवळून ती घरांत कणीक आणायला जाऊं लागली. पण त्यानें तिला जाऊ दिलें नाहीं. रडून इतका आकांत केला की उचलून कडेवर घेतले तेव्हांच तो थांबला. तसेंच त्याला घेऊन घाईघाईनें तिनें एका वाटींत कणीक घेतली आणि बाहेर येऊन त्या गोसाव्याच्या तुंब्यांत केव्हां एकदां ओतीन आणि ही पिडा केव्हां एकदा जाईल असें तिला झालें.

पण कडेवरच्या बाळाला त्याचें कांहींच नव्हतें. तो हात उंचावून हंसून त्या बैराग्याकडे झेंप घेत होता. गोसावी त्याला म्हणाला:—
"हां हांऽऽ भैय्या; हंसते हो, आते हो, चलो चलेंगे श्रीगुरुदर्शनके लिये—" बाळानें त्याचा तुंबा धरायला हात पुढें केलें. गोसाव्यानें भिक्षा घेतली; झोळींतील चिमुटभर राख हातावर घेऊन फुंकली; आणि "ईश्वर तेरा भला करें" म्हणून तो निघूनही गेला तरी ती त्याच्याकडे पहातच राहिली.

आणि मग ती अधिकच भ्याली. नाहीं नाहीं ते विचार तिच्या मनांत येऊ लागले. घरांत जाऊन तिनें चटकन् दार लावून घेतलें. आणि तीन्हीसांजेला दार लावणें बरें नव्हे म्हणून तें पुन्हा उघडलें. बाळावरून मीठमोहऱ्या ओवाळून टाकल्या. तो लबाड हातवारे करून तिला हसूं लागला.

तशी कांहीं ती अशिक्षित नव्हती. जुन्या काळची तर मुळींच नव्हती. शाळेंत जाऊन ती मॅट्रिक झाली होती. आईनें तिला घरकाम आणि सुसंस्कृतपणाचे आचारविचार—व्यवहार शिकविले होते. लग्न झाल्यावर ती वर्षभर सासरीं राहिली होती तर तिनें सर्वांकडून कौतुक करून घेतले होते. तिच्या पायगुणानें त्याला सहाच महिन्यांत बढती

आणि बदली मिळाली होती. गर्भारपणीं तिनें सासरीं आणि माहेरीं सगळीं डोहाळजेवणें वसूल केलीं होतीं. आईकडून तीन महिनें निगुतीचे बाळंतपण करून घेतलें होतें. नौकरीच्या गांवी एकटे रहायचे म्हणून तिला बरोबर आणून आणीक दोन महिने ठेऊन घेतले होतें. "बाळ मोठा झालाय्– आणीक किती दिवस रहायचे तरी–" असे म्हणून पापडलोणची, तिखट मसाला, मीठ हळद, भाजणी मेतकूट, सर्व कांहीं करून ठेऊन ती महिन्यापूर्वी गेली होती. आणि त्यानंतर ती आपला राजाराणीचा संसार हुरूपानें, हौसेने, व हिरीरीनें स्वतःच्या हिंमतीवर चालवीत होती.

ग्रॅज्युएट होतांच त्याला फार हुषार म्हणून वशील्यानें थर्ड ग्रेडची नौकरी मिळाली. त्याच त्याच प्रकारचीं प्रकरणें, फाईली, मसुदे, उत्तरे, खतावण्या, तक्ते, रिपोर्ट, तक्रारी आणि टिपणें यांनीं दोन वर्षांच्या अवधींत त्याच्या रसिकतेचें, विचक्षणेचें, हौसेचें आणि ज्ञानाचें खोबरें करून त्याला काम करणारें यंत्र बनविलें आणि सेकंड ग्रेड मिळण्याला लायक केलें. तातडीचें काम तुंबून राहिलें म्हणजे तो रात्रीं उशीरापर्यंत घरीं येऊं शकत नसे.

बैरागी आणि फकीर यांची तिला लहानपणापासून भीति बसली होती. शेजारी एक बिऱ्हाड होते ती बाई तिच्या आईला जादूटोणा, मंत्रतंत्र, भानामती, बैरागी, फकीर यांच्या अनेकविध गोष्टी सांगत असे. आई त्या ऐकून विसरून जाई; पण तिच्या बालमनांत त्या ठसून राहात. पुढें कळूं लागल्यावर या गोष्टींवर तिचा मुळीच विश्वास राहिला नाहीं. पण पूर्वी एकदा झालेले भीतीचे संस्कार अंतर्मनात मूळ धरून राहिले.

"बाळाला आपण उगीच बैराग्यापुढें नेले ! काय होते म्हणा ! पण तो बाळाला 'गुरूकडे चल' असे कां म्हणाला ? मुकाटयानें भिक्षा घेऊन न जातां त्यानें हा अधिक प्रसंग का केला ? त्यानें संकटाची

कांहीं सूचना तर दिली नाहीं.?

" हे बैरागी घरदार सोडून असें कां भटकतात ? सुखी संसाराचे ते शत्रू तर नाहींत ? त्यानें राखेची चिमुट कां फुंकली ? यांच्या अंगात खरेंच मांत्रिक सामर्थ्य असतें का ? त्यानें तांदुळ न घेतां आटाच कां मागितला ? "

मच्छिंद्रनाथ, गोरखनाथ यांच्या गोष्टी तिच्या वाचण्यांत ऐकण्यात होत्या. " छेः, तशी एखादी शक्ति या गोसाव्यात असणें अगदींच अशक्य ! तर मग लहानपणी शेजारणीनें सांगितलेल्या मांत्रिकासारखे कांहीं तरी—"

तिच्या सांगण्याप्रमाणें त्या मांत्रिकाला कर्णपिशाच्च वश होते. जातीचा मारवाडी होता, पैशाच्या लोभानें त्यानें अघोरी साधन केलें. असाच एक गोसावी त्याला भेटला होता. त्यानें ते करविले. अनेक चमत्कार तो करी. मागाल ते आणून देत असे. ते साधन करण्यासाठीं त्यानें किती भयंकर कृत्यें केली होती ! बाळंतीण मेलेल्या एका तेलिणीला त्यानें जळूं न देतां चित्तेतून ओढून काढले. तिच्या हाडांचा सांपळा त्यानें मंत्रून पेटींत भरून ठेवला. असलेल्या एका मुलीशिवाय पुढें होणारी मुलें तिला बळी दिली. ' कशाला मेले असल्या गोष्टी करतात ?'

" आपल्याकडून नेलेल्या कणकेचे तो पुतळे तर कळणार नाहीं ? त्यावर बिब्याच्या फुल्या घालून सुया तर टोचणार नाहीं ? कुणाला तो छळणार अशी करणी करून ? "

" छे : छे : ! आपण कुणाचें काय कधीं वांकडे केलें आहे ? कोण आपल्या वाईटावर आहे ! कुणाची आपणाला भीती आहे ? "

पण भीति तिला सारखी वाटत होती. अंधार पडला तेव्हां तिनें दिवे लावले; शेगडी पेटविली, भात टाकला. बाळ कांहीं वेळ खेळला, नंतर किरकिरला, रडला, प्याला आणि झोंपला. तिनें शेजारी डोंकावून पाहिलें. तीं दोघं कुलूप लावून फिरायला गेलीं होतीं.

" आज अजून कां बरं आले नाहींत ? इतका उशीर त्यांना कधीं होत नाहीं." तिनें घडयाळाकडे पाहिले. ते बंद पडले होते. किल्ली विसरल्यानंतरही ते बिचारे कित्येक तास चालले होते. ती दचकली, नंतर तिचें तिलाच हंसू आलें.

" आज आपल्याला असें काय झालें आहे ? मनानें असे भलतेंच खेळ कां चालविले आहेत ? आला असेल दारीं गोसावी ! म्हणून काय झाले ? झाला असेल घरीं यायला उशीर ! कधीं होत नाहीं का ? आणि पडलं असेल घडयाळ बंद ! किल्ली दिली नाहीं वेळेला तर कसं चालेल ? "

पण ही मनाची समजूत करणं झालं. मनानें धास्ती घेतली होती अज्ञाताची, भविष्याची, एकदम अचानक घडून येणाऱ्या घटनांची, नको असलेल्या गोष्टींची. आणि तीहि अकारण !

तिनें पाळण्यांत झोपलेल्या बाळाकडे पाहिले. तो इतका स्वस्थ झोपला होता कीं, जणूं काय जगांत सर्वभर शांति आणि सुख नांदते आहे. तिनें चुलीवर शिजणाऱ्या भाताकडे पाहिले. तो आंच, वाफ आणि उकळी यांनीं खदखदून शितें बाहेर फेकीत होता. कोणते खरे ?

" आपला एक संसार सुखाचा आहे; पण जे सुखी नाहींत असें कितीतरी असतील. ते आपल्या वाईटावर नसतील कां ? त्यांची दृष्ट आपल्या सुखी जीवनाला कां लागूं नये ? या अफाट असंतुष्ट जगाच्या भेडसावण्यापासून आपल्या इवल्याशा ऊबदार घरट्याला पाखरण आपण कशी घालणार ? बाळाला किंवा त्यांना कांहीं झाले—इडापिडा टळो; अमंगल जळो ! – तर आपणहि त्यांच्याच भाऊगर्दीत मिसळून जाणार नाहीं का ? "

तिचें मन अधिकच अस्वस्थ झालें. हे असलें आणि नाहीं नाहीं ते विचार तिच्या अस्वस्थ मनांत गोंधळ घालूं लागले. विचारांचे बहुरूपी बैरागी आणि फकीर !

आणि कांहीं वेळानें त्यानें जेव्हां येऊन दार ठोठावले तेव्हां ती इतकी घास्तावली होती कीं चटकन् जाऊन ते उघडणें तिला जमलें नाहीं. त्यानें बाळाला हांक मारली. जणु कांहीं धांवत येऊन तो दार उघडणार होता–तिनेंच ते अखेर उघडलें. तो आंत येतांच परत लावून घेतलें. आणि त्याच्या गळ्यांत पडून ती मुसमुसून रडूं लागली.

" काय झालं ग ? त्यानें विचारले. त्याला कांहीं कळेचना. ती त्याला अधिकच बिलगली आणि त्याच्या छातीवर मान टाकून स्फुंदून स्फुंदून तिनें त्याचा शर्ट भिजविला.

त्यानें तिला कुरवाळले, थापटले, विसावले; मग विचारले:—
" अगं पण सांगशील तर खरं काय झालं ते ? "

" कांहीं नाहीं; तुम्ही लवकर का आला नाहीं ?"

" वा:– म्हणून त्यासाठीं असं रडावं लागतं का ?"

" पण मला भीति वाटली ! "

" कसली ?"

" कसली तरी. "

हळूंहळूं त्यानें तिच्याकडून सगळी हकीकत काढून घेतली. कुणीहि हंसावें अशींच ती होती. ' मी नाहीं सांगत जा; हंसाल तुम्ही.' असे ती सांगतांना म्हणतच होती. त्यानें मग हंसून म्हटले:–

" अगं पण वेडे; ' श्रीकिशन के दर्शन करने आये सदाशिव गोकुल में ' अशी कल्पना तुला कां सुचली नाहीं ! "

" अय्या ! खरंच कीं ! "

ही नवी कल्पना खरंच किती छान होती ! पूर्वीच्या त्या अनिष्ट अभद्र छाया कुणीकडे दूर भिरकावल्या गेल्या. या कल्पनेनें म्हणा किंवा त्याच्या येण्यानें म्हणा तिला बरें वाटलें. ती सुखावली. जेवणी खावणी होतात तों बाळ जागा झाला, बराच वेळ खेळला, नंतर रडूं लागला त्याला पुढें घेऊन पाजतांनांच तिला झोंप लागून गेली.

त्यांच्याकडे कौतुकानें पहात तो खुर्चीवर बसून वर्तमान पत्राची पानें चाळीत होता. ऑफिसच्या कामाच्या रगाडयानें महिरून टाकलेली त्याची रसिकता आणि विचक्षणा आज या घटनेनें जागी झालीं होती. बाळानें जगांत येऊन तिच्या शरीररचनेंत जो लोभस बदल घडवून आणला होता त्याचा गाभा नेमका कुठें आहे ते तो आपल्या चिमुकल्या गोंडस हातांनीं व कोंवळ्या नाजुक ओठांनीं दाखवीत होता. पण त्यानें तिच्या मनोरचनेंतहि जो गंभीर आणि विलक्षण असा बदल केला होता त्याचे दर्शन आज त्याला होत होते.

त्याला आठवलेः– नौकरी लागल्यानंतर लग्न करायचे ठरतांच अनेक मुली सांगून आल्या त्यांत नेमकी हीच मुलगी आपण पसंत केली ती सुरूप किंवा हुषार आहे आणि लहानपणी आपल्या शेजारी राहिलेली म्हणून परिचित आहे येवढ्यासाठींच नव्हे. लहानपणी ती नऊ वर्षांची अजाण अल्लड बालिका असेल नसेल तेव्हां आपल्याला चांगले कळूं लागले होतें; आणि एकदां मेघांचा प्रचंड गडगडाट झाल्यावेळीं अंगणांतून भेदरून धांवत येऊन ती आपल्याला बिलगली होती त्या सुखद स्पर्शाची आठवण अजून ताजी होती म्हणून ही भयभीत झालेल्या स्त्रीहृदयाच्या स्पर्शाची खुमारी त्यानें आजहि अनुभावली होती. पण दोन्हींत किती तरी फरक !

त्या वेळीं त्याला वाटलें:– "मुली विनाकारण भित्र्या असतात." आज त्याला वाटलें:– "स्त्रीहृदयाचे कोडे हे असें गुंतागुंतीचे आहे तर ! जबाबदारीची आत्यंतिक जाणीव आणि अतिस्नेह यांमुळें स्त्रीचें हृदय हळुवार बनते भीरुतेचें हे वर्म आपल्याला आजवर कळलेंच नव्हतें.

"गोसाव्याला पाहून ती उगीचच भेदरली का? शंकराला पाहून यशोदा अशीच वागली असेल. जीवनांतल्या नव्या अंकुरांना अमंगल, अभद्र आणि भयानक यांपासून दूर ठेवण्यासाठीं मातृत्वानें ओढलेली ही भीतीची रेषा–हिचे कौतुक करायला हवे."

कौतुकानें त्यानें तिच्याकडे पाहिले. उशाखाली हात घेऊन ती शांत मनानें झोंपली होती. आपल्या हक्काच्या अमृतकुंभावरचा हात बाळानें काढला नव्हता.

आणि एक कोडे त्याला सुटले नाहीं. कशानें तिचें मन शांत झालें? भयानकालाहि सौम्य स्वरूप आहे का? शूरांच्याहि हृदयांत थरकांप भरविणाऱ्या शंखभेरींनीं गर्जत येणारा आणि वीरांच्या धीरोदात्त दृष्टीला अंधेरी आणणाऱ्या शस्त्रास्त्रांनीं खणखणत येणारा सर्वसंहारक रुद्र जर आपल्या अंकुराचें रक्षण करील असा विश्वास वाटला तर स्त्री त्याचेंही स्वागत करील. आणि महाप्रलयांतही या अंकुराला केसाचा धक्का लागणार नाहीं.

त्यानें वर्तमानपत्र मिटून बाजूला ठेवले. एकामागून एक दोघांचीहि अगणित चुंबनें त्यानें घेतली. अतृप्त, हळुवार, आसक्त अशी. बाळ खुदूकन हंसला गाढ झोंपेंत. अर्धवट झोंपेंतच तिनें आपला हात त्याच्या गळ्यांत घालून त्याला जवळ ओढले.

# कैलासाचा निर्माता

" सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालायतस्मै नम:"

कालाय तस्मैनम:. महान् वसाहती, महान् कलाकृति, महान् विभूती त्याच्या उदरांत गडप होतात, स्मृतिशेष होतात, इतकेंच नव्हे तर लोकांच्या आठवणींतूनहि त्या पुसून टाकण्याची महाकालाची धडपड असते. त्याच्या या सर्वंकष सामर्थ्यापुढें विनम्र होऊनही मानवानें सर्वस्वी शरणागति पत्करली नाहीं.

अनंतकालापासून, वाणीची देणगी मिळाली तेव्हांपासून आपल्या पराक्रमांनीं विस्मृतीलाहि स्तिमित करणाऱ्या पुरुषोत्तमाचे स्मरण आणि संकीर्तन मानवानें सतत चालवून कालाचाहि पराभव केला आहे. कहाणीनें मर्त्यालाहि अमर केले आहे. ज्यांच्या अवशेषांचा मागमूसहि राहिला नाहीं अशांच्याहि गुणांचे व कृतींचे निवेदन परंपरागत सतत चालत आले आहे, मग जी महान् निर्मिती कालाच्या उदरांत अजून पूर्णपणें गडप झाली नाहीं, दूरदूरच्या देशोदेशीचे लोक अजूनहि जिचे

भग्नावशेष पाहून स्तिमित आणि स्तंभित होतात त्या वेरूळच्या कैलास लेण्याची नितांत कलात्मक निर्मिती कुणी आणि कशासाठीं केली हे कुतुहल अगदीं कुणालाहि अनावर असेंच आहे.

महानुभावांच्या लीलाचारित्रांत सांगितले आहे कीं श्रीचक्रधर संचार करीत आले ते " एलापुरी माणकेश्वरी वसाति " लेणे अगदीं एकीकडे आणि निर्जन; शिष्यांना अंधुक प्रकाशांत आवारांतून अस्फुट छाया वावरतानां भासत पण भेटत नसत. श्री चक्रधरांनी सांगितले;' ते उपासक छायारूप; 'त्यांच्या वाटेला जाऊ नका.' त्यांनी लेण्याच्या दक्षिण भागीं असलेल्या एका विवरात प्रवेश केला, शिश्य मागोमाग गेले. विवर दुसऱ्या एका लेण्याच्या मजल्यावर निघाले खालीं उतरून येतात तो पुढील अंगणात गोसावी धुनी पेटवून भोवती बसले आहेत. नंतर श्रमणांची लेणी ओलांडून पलीकडे जाऊन पाहतात तो समोर एलापूर कीं ! किती सान्निध !

कैलास लेण्याचे नांव माणकेश्वर होते तर! आणि मुसलमानांनीं ते उध्वस्त करण्यापूर्वीही श्रीचक्रधराच्या कालीं ते ओसाड, भयाण आणि निर्जन झाले होते? ते तसे केव्हां आणि कां झाले? आणि ते कोण छायारूप उपासक तेथें कां अजूनहि रेंगाळत होते? गॅझेटियरनें नोंद करून ठेवली आहे कीं या लेण्याला रंगमहाल असे म्हणत: कारण यांतील नितांत सुंदर शिल्पकृतींना सुंदर रंग दिलेले होते; विदर्भांतील अचलपूरच्या राजानें आपल्या कलांवतांकडून म्हणे रंग देवविले. पण देवळाला रंगमहाल हे नांव केवळ रंगांवरून पडले असेल ?

कुणी देवळाचा रंगमहाल केला? कशानें या सह्याद्रीच्या कुशींतील कैलासतुल्य मंदिराचे पावित्र्य आणि वैभव मूर्तिभंजकांची सावली पडण्यापूर्वीच नष्ट झाले! या लेण्याला कैलास असे कोण केव्हां आणि कशासाठीं म्हणूं लागले ?

काळाच्या उदरांत गडप झालेले हे रहस्य त्या असंख्य भग्नावयव मूर्ती काय सांगू शकणार? मूर्तिभंजकाचा हात जेथें अजस्र उंचीमुळें पोंचू शकला नाहीं त्या सभामंडपाच्या चांदव्यामधील एकच मूर्ती आपल्या सर्व भावनांसह शाबूत असूनहि आपण कितीही मान अवघडून पाहिले तरी लाजेनें कांहीही न सांगता स्वस्थ राहते. वेरूळच्या खेड्याकडे जातांना अर्ध्यावाटेवर घृष्णेश्वराचे सुप्रसिद्ध ज्योतिर्लिंग आहे. मूळ भव्य मंदिर यवनांनी पाडले आणि अहल्याबाईनें हे सध्याचे छोटेसे मंदिर बांधले म्हणे. वाटेंत एखाद्या झाडाखाली पाचोळयावर फणा काढून बसलेला नाग आपल्याला कांहीं सांगण्यासाठींच जणू काय तेथें थांबला आहे! पण भीतीनें आपण काढता पाय घेतो.

शिवाजीच्या आजोबांनी जेथे पाटीलकी केली त्या गांवचे लोक यात्रेकरू आणि प्रवासीं यांच्यापासून आपल्याला काय लाभ होतो याच विवंचनेंत असतात. कुणाकुणाला कांहीं माहीत नाहीं. या महान् आश्चर्याच्या निर्मितींची हकीगत विस्मृतीत विलीन होणार?कालाचे काम फत्ते होणार?

नाही–आजीने नातवाला, बापाने मुलीला अशी ही कहाणी आजवर सांगितली आहे. एका गुरवाच्या म्हातारीनें ही सांगितली. आपण अजूनपर्यंत कशाला जगलो हेच तिला कोडे आहे. कदाचित् ही कहाणी सांगण्यासाठींच असेल. आतां ती अमर झाली;अक्षरांत आली कहाणी!

त्याकाळीं एलापूर हे आजच्यासारखे पडिक खेडे नव्हते चांगले समृद्ध नगर होते. चौक, प्रासाद, तटबंदी, उद्यानें व बाजार यांनीं संपन्न होते. पश्चिमेकडील बंदरांहून येणाऱ्या राजमार्गावर होते. सेऊणदेश असे या प्रदेशाला म्हणत. स्वयंभू प्राचीन शिवालिंगामुळें त्याला आणखी महत्त्व आले होते. तसा सारा देशच शिवालयांनीं, शिवोपासकांनीं भरलेला. घृष्णेश्वर असे नांव या स्वयंभू ज्योतिर्लिंगाला मिळाले नव्हते. पूर्वेकडे काळ्या कभिन्न कातळांची रांग, त्यांतील एका घळींत

एक स्वच्छ पाण्याचा झरा स्वयंभू शिवलिंगापासून अर्ध्याकोसाच्या अंतरावर घनदाट झाडीनीं झाकलेला. डोंगराच्या टोकाला श्रमणांनी कोरलेलीं कांहीं लेणी आणि यांत 'सर्व दुःख सर्व क्षणिक' म्हणून वस्तीपासून दूर राहिलेले कांहीं भिक्षुगण.

एलापूरचे वैभव सेऊण, कुंतल, आभीर, अश्मक आणि विदर्भ देशांवर स्वामित्व गाजविणारा राष्ट्रकूट राजा महाराजाधिराज परमेश्वर परमभट्टारक पृथ्वीवल्लभ दंतिदुर्ग याने वाढवीत नेले. त्यातही राणी घृष्णादेवी हिनें ते आपले वसतीचे ठिकाण केल्यामुळें त्याला राजधानीचे स्वरूप आले. राज्यव्यवस्था आणि मुलुखगिरी यांसाठीं ससैन्य संचार करणारा राजा जातां येतां येथें कांही दिवस विश्रांतीसाठीं रहात असे त्यावेळीं त्याच्या अफाट सैन्याच्या शिबिरांनीं असमंतातला भूप्रदेश फुलून जाई. त्या तरुण पराक्रमी राजानें सिंधच्या अरबांचा परामव करून आपल्या प्रजेंत विश्वास आणि प्रेम उत्पन्न केलें होतें. त्याची तरुण राणी घृष्णादेवी परम शिवभक्त होती. आणि एलापूरच्या स्वयंभू शिवलिंगाची अर्चा मोठ्या आस्थेनें करीत असे. तिला मुलगा झाला तेव्हां तर वेरूळच्या वैभवाला कांहीं औरच भरती आली. त्याच वेळीं दंतिदुर्गानें चालुक्य राजा कीर्तिवर्मा याचा पराभव केला. राणीच्या मनांत आले. अवंतीला जाऊन महाकालेश्वरासंनिध हिरण्यगर्भ महादान करावे. अरबांच्या पराभवानें निश्चित झालेल्या गुर्जर राजानें तेथें येऊन राजा दंतिदुर्गाची सुवर्ण तुला करविली, महादानाच्या वेळी स्वतः द्वारपालाचे काम केलें आणि आपली अत्यंत लावण्यवती कन्या माणकावती त्याला अर्पण केली. सेऊण देशच्या राजाची संपत्ती उतास गेली.

राणी माणकदेवी अप्सरेसारखी सुंदर,फुलासारखी नाजुक;तारुण्याने मुसमुसलेली आणि अत्यंत विलासी होती. राजा तिच्यावर अगदीं लुब्ध होऊन गेला. स्वतःला विसरला नानाविध भोगविलासांत गर्क झाला. सैन्यें शिथिल झालीं शृंगाराचे राज्य झाले.

आणि एके दिवशीं एकाएकी घृष्णादेवीचे बालक नाहींसे झाले! राजमंदिरांत हलकल्लोळ उडाला. शोधाशोध सुरू झाली. राजानें आपल्या अधिकाऱ्यांना देहांताची धमकी दिली. अनेकांचे संशयावरून छळ झाले. पण कांहीं मागमूस लागला नाहीं. राणी घृष्णादेवीनें स्वयंभू शिवमहादेवापुढें अन्नपाणी वर्ज करून धरणें धरले. अकरा दिवस असे गेले. राणी घृष्णादेवी दिवसेंदिवस क्षीण होऊं लागली. महादेवाला दया आली. राणीला दृष्टांत झाला "तुझं बालक समोरच्या डोंगराच्या घळींत झऱ्याकाठीं सुरक्षित आहे. झऱ्यावर पाण्यासाठीं येणाऱ्या हिंस्र-श्वापदांच्या भक्ष्यस्थानीं पडावें म्हणून माणकावतीनें मत्सरानें तें तेथें ठेवलें आहे."

महादेवाच्या प्रसादानें राजकुमार पुन्हा लाभला म्हणून राजाला मोठा आनंद झाला. मोठा उत्सव झाला. देवी घृष्णावतीच्या भक्तीचा दुंदुभी दुमदुमून राहिला. लोक तिला साधुसंतांचा मान देऊं लागले. देवाचें नांव घृष्णेश्वर असें पडलें. राजवैभवांत त्याची पूजा, अर्चा, अभिषेक, नगारा, नैवेद्य आणि उत्सव होऊं लागले. सगळीकडे आनंदी आनंद झाला.

राणी माणकावतीला तिच्या दुष्कृत्याबद्दल कांहीं शासन–छे:, ती लावण्यवती, पद्मगंधा, भोगचतुर, राजाला तिचा मोह आवरला नाहीं. चौकशी झाली. आणि तिच्या दोन दासी आणि एक सेवक यांचें बलिदान झालें.

नानाविध विलासांत माणकावतीसह राजा दंग राहूं लागला. पण तिला घृष्णेश्वराचें वैभव, गौरव आणि उत्सव सहन होइनात. राणी घृष्णावतीचें महत्त्व तिच्या डोळ्यांत सलूं लागलें. तिनें राजाजवळ हट्ट धरला कीं याहून वैभवशाली मंदिर आपणासाठीं येथेंच एलापुरीं बांधवावे आणि त्याला माणकेश्वर असें नांव द्यावें. राजाला हें पटलें नाहीं. पण राणी माणकावती रुसवाफुगवी आणि धुसफूस करूं लागली, रंगाचा

बेरंग करूं लागली, असेच एकदां श्रृंगारसागरांत गटंगळ्या देऊन तिनें राजाकडून वचन घेतलें.

पण वचनाची पूर्ती होईना. सामंतसचीवांच्या सभेंत सारासार विचार प्रभावी होत असे. आपण राणीची समजून करूं असें राजाला वाटे. पण तिची समजूत पटणें शक्य नव्हतें. ती हट्टी नि दुराग्रही तर होतीच, पण मत्सरानें तिला भडकावले होते. शिवाय तिला खात्री होती कीं राजा आपला सौंदर्याच्या, तारुण्याच्या, आणि प्रीतीच्या जाळ्यांत पुरेपूर गुरफटलेला आहे.

वेरूळच्या स्वयंभू महादेवाची निस्सीम उपासना थोरल्या राणी-साहेबांनीं केली म्हणून राजाला हे कुबेराचें ऐश्वर्य आणि वीरभद्राचें सामर्थ्य प्राप्त झालें अशी लोकांची समजूत होती. आपल्यामुळें राजाचे वैभव आणि दरारा वाढला अशी माणकावतीची समजूत होती. कांहीं केल्या राजा आपले ऐकत नाहीं असें पाहून त्या दुरभिमानी स्त्रीनें आत्म-नाश करून घ्यायचें ठरविलें. तिनें आतताईपणानें अन्नपाणी वर्ज केलें आणि अशी अविचारी शपथ घेतली कीं घृष्णेश्वराहून उंच आणि विशाल अशा माणकेश्वराचें देवळाचें शिखर उभारलेलें पाहिल्याशिवाय मरेन पण प्रायोपवेशन सोडणार नाहीं.

तिचें मन वळविण्याचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. अगणित कारा-गिर अनेक वर्षे खपून त्यांनी घृष्णेश्वराचें उत्तुंग आणि विस्तीर्ण देऊळ बांधलें होतें. "त्याहून मोठें देऊळ या नाजुक राणीसाठीं कांहीं दिवसांत बांधणें केवळ अशक्य आहे, ही आततायी राणी अशीच मरणार" हें कळत असूनहि मोहवश होऊन राजानें प्रयत्नांची शिकस्त करण्याची आज्ञा आपल्या अधिकाऱ्यांना दिली.

आपल्या काळजाचा हा लचका लवकरच तुटणार या जाणिवेनें राजा अत्यंत दुःखी झाला. सामंत, सचीव, सेनानी, कुणालाच कांहीं सुचत नव्हते. शेवटी शोधाअंतीं कळले कीं दैवी सामर्थ्याचा एक

पाथरवट चालुक्यराज विक्रमादित्य याच्या पदरीं आहे. याच्या आज्यानें महाबालिपुरम् येथील प्रचंड सूर्यरथ कोरला. आणि त्याला विश्वकर्म्याचा अवतार समजत. विक्रमादित्याची राणी विरुपाक्षा हिच्या सांगण्यावरून त्या दैवी सामर्थ्याच्या कारागिरानें असंख्य लोकांना एकावेळीं कामाला लावून पट्टाडिकल येथें एक विशाल मंदिर बांधलें आणि पाहतां पाहतां उभे राहिलेलें हें मंदिर पाहून देशोदेशींच्या लोकांनीं तोंडांत बोटें घातलीं. दोनशे कोसावरून त्या पाथरवटाला आणण्यासाठीं वायुवेगानें जाणारी एक घोडदळाची तुकडी राजाचीं आज्ञापत्रें घेऊन गेली आणि प्रत्यही एक ताज्या दमाची तुकडी त्यांच्या पाठोपाठ जाऊं लागली. दिवसांमागून दिवस चालले. राणी माणकावती सुकत चालली. उशा-पायथ्याशीं राजवैद्य बसून घटकोघटकेला नाडी पाहात होते. गंगोदक सुद्धां घेणार नाहीं हा आपला निग्रह तिनें सोडला नाहीं. शेवटीं एके रात्रीं राजवैद्यांनी सांगितलें 'राणीची नाडी सुटत आहे, ती एकदोन दिवसांची सोबती आहे.' ती रात्र सरली त्याच पंचपंचउषःकालीं पूर्वेकडील शेवटच्या शिबिरांना एक स्वारांचें पथक वेगानें येतांना दिसूं लागले. हां हां म्हणतां बातमी राजप्रासादांत पोंचली. अजून सूर्य क्षितिजावर येतच होता, तोंच महासामंतांनीं त्या दैवी सामर्थ्याच्या शिल्पकाराला राजापुढें आणून उभे केलें.

तो काळासांवळा, उंचापूरा, रेखीव नीटस चेहऱ्याचा, तेजस्वी डोळ्यांचा, मध्यम वयाचा, मजबूत बांध्याचा, पिळदार स्नायूंचा पुरुष समोर येऊन उभा राहिला तेव्हां राजा कांहीं काळ टकमक पहातच राहिला. आपले सार्वभौमपद विसरून अभावितपणें त्याला सामोरा गेला. सामंतांनीं म्हटलें:– महाराजाधिराज, हाच तो पट्टाडिकलचा पाथरवट. आपल्या शिलेदारांनीं क्षणांचीही ! उसंत न घेतां रात्रंदिवस दौड करून येथें आणला.

"दैवी सामर्थ्याचा शिल्पकार!" राजा म्हणाला "पण काय उप-

योग! वेळ निघून गेली. राणीचा जीव वाचविणें आतां कुणाच्याहि हातीं राहिलें नाहीं."

"महाराज, असें म्हणूं नका" तो शिल्पकार म्हणाला, "महादेव प्रसन्न होईल तर अजूनहि राणीचा जीव वांचेल."

"राणीची घोर प्रतिज्ञा तुला माहीत आहे?"

"होय महाराज" सामंतांनी त्याला सर्व हकीकत आधचि सांगितली होती.

"घृष्णेश्वराचे देवालय तूं पाहिले आहेस?"

"महाराजांच्या दर्शनाला येण्यापूर्वीच मी महादेवाचे दर्शन घेऊन आलो."

"मग घृष्णेश्वराच्या देवालयाहून विशाल असे मंदिर तुला कांहीं घटकांत कसें बघतां येणार? तूं कोणी जादूगार आहेस? मंत्रानें देऊळ उभे करणार?"

"नाहीं महाराज, मी एक साधा पाथरवट आहे. प्रासादवस्तूंची शिल्पविद्या मात्र परंपरेनें जाणतो. पण महाराजांनीं पुरेसे द्रव्यबळ आणि मनुष्यबळ दिलें तर मला वाटते अजूनही राणीची मनीषा सफल होईल.' कांहींतरी अद्भुत कल्पनेंची चमक त्याच्या डोळयांत दिसत होती.

"माणकावतीसाठीं पृथ्वीवल्लभ आपला सर्व कोष रिकामा करायला तयार आहे. आणि आपल्या राज्यांतील मनुष्यमात्राला राबवायला तयार आहे. पण तूं हा चमत्कार कसा करणार?"

"प्रथम आसमंताची पाहणी करीन, मग महाराणीची भेट घेईन, आणि नंतर माझ्या सर्व अटी आपण मान्य केल्यास—" "काय वाटेल तें कर पण राणीचा जीव वांचला पाहिजे. नाहींतर, पण वाक्य पुरे न करतां राजा विषण्ण आणि अधोमुख झाला. ती कल्पनाच त्याला असह्य होती.

त्या कारागिरानें निवडक माणसें बरोबर घेऊन आजूबाजूच्या प्रदेशाची पाहणी केली. घृष्णेश्वराच्या मागील बाजूस एके ठिकाणीं त्यानें सांगितलें कीं "या ठिकाणीं अनेक झरे आहेत. मोठें तीर्थ छान होऊं शकेल." समोरील डोंगराच्या घळींतील झाडींत लपलेल्या झऱ्याजवळ तो आला तेव्हां बरोबरच्या लोकांनीं राणीनें मत्सरानें घृष्णादेवीच्या कुमाराला तेथें ठेवल्याचें सांगितलें. मत्सरानेंच राणीनें आत्मनाश ओढवून कसा घेतला हेंहि सांगितलें, स्वयंभू ज्योतिर्लिंगाचें महात्म्य कमी करण्याचा कोणताहि प्रयत्न सफल होणें शक्य नाहीं. अशी श्रद्धाहि बोलून दाखविली. दुपारचीं उन्हें उतरणीला लागेपर्यंत तो समोरच्या डोंगरावर, श्रमणांच्या गुंफांतून, कातळांवरून आणि कांट्याकुट्यांतून बरोबरच्या लोकांना फिरवीत होता तें अतिशय वेगानें.

या पाथरवटाची हकीगत राणीच्या कानांवर गेली आणि तिला लगेच हुषारीहि वाटूं लागली. तिनें एकदोनदां क्षीण आवाजानें विचारलेंहि:– "तो कुठें आहे?" तो आपल्याला भेटायला येणार हें ऐकून तिची मुद्रा प्रसन्नहि झाली. चौथे प्रहरीं स्नान, देवदर्शन आणि भोजन आटोपून तो राजभवनांत आला. लगेच त्याला राणीच्या मंचकाजवळ नेण्यांत आलें. तो तिला अभिवादन करून म्हणाला:–

"देवी, विरोधानें आणि वैतागानें केलेल्या पण तुझ्या दृढनिश्चयी तपश्चर्येमुळें भगवान् कैलासनाथानें तुजवर कृपा केलेली दिसते. तुझे मनोरथ सफल होतील."

राणीनें क्षीण स्मित केलें.

"देवी, तुझा माझ्यावर संपूर्ण विश्वास आहे का?"

राणीनें क्षीण स्वरांत 'हो' म्हटलें.

"मग आपल्या इच्छाशक्तीच्या बळावर आजची रात्र प्राण धारण कर. उद्यां सकाळीं ब्राह्म मुहूर्तावर पूर्वेकडील डोंगरांत जो प्रचंड कातळ आहे त्याच्या माथ्यावर अर्ध्या घटकेंत मी देवमंदिराचें शिखर

कोरून काढतों. त्याचें दर्शन घेऊन तूं आपल्या व्रताची पारणा कर. त्या शिखराखालीं कालांतरानें मी सबंध देऊळ कोरून काढीन. तें शिखर स्वयंभू महादेवाच्या शिखराहून उंच असेल आणि तें मंदिर घृष्णेश्वराच्या देवालयाहून विशाल असेल."

सर्वजण स्तिमित झाले. पण त्यांना विश्वास होता कीं हें याच्या मनगटाच्या अद्भुत सामर्थ्याच्या कक्षेंतलें आहे. तो तेजस्वी पाथरवट राजाला म्हणाला:– "पण अधिराज, माझ्या तीन अटी आहेत. मी मागेल तितकें धन मला वेळोवेळीं दिलें पाहिजे. मी सांगेन त्याच कारागिरांनीं सांगेन तसें काम केलें पाहिजे. आणि या कामांत माझीच आज्ञा फक्त प्रमाण राहिली पाहिजे–दुसऱ्या कुणाचीहि–प्रत्यक्ष अधिराजाचीसुद्धां नाहीं."

पुन्हां सर्वजण चकित झाले. पण राजानें त्या सर्व अटी मान्य केल्या. रातोरात सर्व सामुग्री सिद्ध झाली. उषःकालीं यथाविधि समंत्रक भूमिपूजनपूर्वक छिन्नीहातोडयांची खणखण त्या दरींत आणि गुंफांतून घुमूं लागली. उगवत्या सूर्यानें माणकेश्वराच्या शिखराचें प्रथम दर्शन घेतलें. राणीला अत्यंत काळजीपूर्वक त्या कातळाच्या माथ्यावर आणण्यांत आलें. काळ्या पाषाणाची कलशाकार शिखराकृति तेथें सिद्ध झाली होती. सभोंवतालचा दगड फोडून काढला होता, सभोंवतीं अगणित नेत्र कौतुकानें विस्फारले होते. शिखराची गंधपुष्पाक्षतांनीं पूजा करून राणीनें गंगोदक प्राशन केलें. राणीची प्रतिज्ञा पुरी झाली आणि राजाला आनंद झाला.

पण हा पाथरवट आपली प्रतिज्ञा कशी पूर्ण करतो याकडे सर्वांचें लक्ष वेधलें. शेंकडों शिल्पकार पट्टाडिकलहून आणि इतर ठिकाणांहून आणवले गेले. हजारों कामगार त्यांच्या हाताखालीं राबूं लागले. पाण्यासारखा पैसा खर्च होऊं लागला. त्या स्थानाला एखाद्या यात्रेचें स्वरूप आलें. दिवसभर सर्व वातावरण हत्यारांच्या आवाजांनीं दुमदुमून जात

असे. बाजार फुलून गेले; मनें आनंदित झालीं. स्वयंभू महादेवाची आराधना एखाद्या महोत्सवासारखी होऊं लागली. काळ्या कातळावर चंदनाच्या रेघांनीं प्रतिदिन आंखून दिलेला भाग कारागीर खोदून काढत होते, रेखून दिलेल्या आकृति शिल्पकार साकार करीत होते. एका तसूंचेंहि अंतर पडूं दिलें जात नव्हतें, क्षणाचाही विलंब होत नव्हता आणि प्रतिदिन तें प्रचंड देवमंदिर आपल्या विविध अवयवां-सह जणूं काय भूमींतून अंगुले अंगुले वर येत होतें.

कुशल राजवैद्यांची औषधयोजना आणि आपल्या मनासारखें झाल्याचा उत्साह यांनीं राणी लवकरच पूर्ण बरी झाली इतकेंच नव्हे तर अधिक सुंदर दिसूं लागली. भोगविलासांना ऊत आला. तारुण्याचा उन्माद ओसंडूं लागला.

त्या दैवी सामर्थ्याच्या शिल्पकारानें सांगितलेल्या ठिकाणीं घृष्णेश्वराच्या मागील बाजूला एक अतिशय मोठी पुष्करणी खोदण्यांत आली. त्यांत मधुर पाण्याचे इतके झरे लागले कीं ते तीर्थ नेहमीं भरलेलें राही. लोक आनंदित झाले. त्या तीर्थाला शिवालय तीर्थ असें नांव पडलें. प्रतिदिन तीर्थांत स्नान करून तो स्वयंभू शिवलिंगाच्या दर्शनाला येत असे त्या वेळीं त्याच्या दर्शनासाठीं दुतर्फा स्त्रीपुरुषांच्या रांगा उभ्या राहात. हा विश्वकर्म्याचा नातू श्रद्धा, कुतूहल आणि आदर यांचा विषय झाला.

राणी माणकावती रोज देवळाचें काम पहायला येत असे. घटकान् घटका ती भिंतीवरील, छतावरील, गवाक्षांतील, खांबांवरील आणि दारांवरील विविध सुंदर मूर्ति साकार होतांना पहात असे. सावलीसारखी त्याच्या मागेमागे फिरे, त्याच्याशीं गुजगोष्टी करायला पाही, पण तो आपल्या कामांतच गर्क असे–एक त्रिभुवनसुंदरी आपल्याजवळ उभी आहे याची त्याला कांहींच क्षिति नसे.

घृष्णादेवीच्या राजकुमाराला ज्या घळीतील झऱ्याजवळ लपविलें

होतें तेथें त्यानें एक गुंफा स्वतःसाठीं तयार केली आणि तेथें तो राहूं लागला. त्या झऱ्याभोंवतीं त्यानें एक तीर्थकुंडहि तयार केलें.

या अजस्त्र कलाकृतीच्या निर्मितींत वर्षानुवर्षें गेलीं. देवालय जसजसें परिपूर्ण होऊं लागलें तसतसें लोक आश्चर्यानें बेभान झाले. जिथें जागा सांपडेल तेथें पुराणांतील प्रसंग कोरले जाऊं लागले. दीपमाळ, महाद्वार, द्वारपाळ, हत्ती आणि नर्तिका जणूं काय-कातळांत कोंडून ठेवलेल्या सर्वांना मुक्त करून पुनः प्रकाशांत आणलें जात होतें.

कलावंत आपल्या कामांत गर्क होते तसा काळहि आपल्या कामांत गर्क होता. सेऊणदेशचा महापराक्रमी तरुण राजा पृथ्वीवल्लभ दंतिदुर्ग अचानक आजारी पडला आणि कांहीं झालें तरी माणकेश्वराचें काम थांबवूं नका असा संदेश देऊन तडकाफडकी परलोकाला गेला. घृष्णादेवी सती गेली. कुंतलाच्या सीमेवर बंदोबस्तासाठीं असलेला त्याचा चुलता कृष्णराज यानें येऊन राज्याचीं सूत्रें हातीं घेतलीं. घृष्णादेवीच्या बालकाला राज्यावर बसवून प्रतिनिधित्वानें राज्य चालविण्याची कल्पना माणकावतीनें हाणून पाडली. तिच्याशीं संगनमत करून त्या लालची कृष्णराजानें स्वतः राज्यपद बळकावलें आणि श्रीवल्लभ हें बिरूद धारण केलें. माणकावतीच्या अमोल साहाय्याबद्दल त्यानें तिला स्वैर आचार–व्यवहाराची मोकळीक देऊन तिचे लाड केले.

कृष्णराजाच्या कारकीर्दीत या अलौकिक शिल्पकृतीचें काम पूर्ण झालें तें माणकावतीच्या देखरेखीखालीं. त्याचें सौंदर्य पाहून लोक त्याला कैलास म्हणूं लागले. त्यावर सफाईचें नाजूक छिन्नीचे ठोके पडूं लागले. तेव्हां तें मंदिर खरोखरच घृष्णेश्वराहून उत्तुंग, विशाल आणि सुंदर दिसूं लागलें. इतकें सुंदर कीं जणूं काय कैलासच, इतकें सुंदर कीं पाहतांच दृष्ट लागावी.

राणी माणकावतीला आपल्या अभिलाषिताच्या पूर्तीचा ध्यास लागून राहिला. प्राकाराच्या उत्तर भागाला अप्रतिम शिल्पकृतीनें

नटलेली एक मोठी गुंफा सिद्ध झाली होती. तेथेंच राणी राहूं लागली. त्या गुंफेमध्यें ठिकठिकाणीं शृंगारविलासांत दंग झालेल्या मूर्ति कोरण्यांत आल्या होत्या. हाच रंगमहाल. या रंगमहालांत राहून मुळांतच विलासी अशी माणकावती अधिकच उत्शृंखल झाली.

कृष्णराज श्रीवल्लभ यानें प्रचंड सैन्यानिशीं हनमकोंडा येथील प्रतापादित्यावर स्वारी केली. आणि तेथील अगणित संपत्ति लुटून पाठवून दिली. ती सर्व माणकावतीनें त्या शिल्पकाराला देऊं केली. राणी त्याच्यावर इतकी लुब्ध झाली होती.

पण त्यानें आपलें काम संपवत आणलें होतें. देशोदेशींच्या कारागिरांना योग्यतेप्रमाणें भरपूर पारितोषिकें देववून त्यानें पाठविलें. तो एकटाच त्या अजस्र कलाकृतीचें सूक्ष्म निरीक्षण करून त्यावर नाजुक सफाईचा हात फिरवीत होता.

आणि राणी त्या कारागिरावर अगदीं वेडी झाली. सारखी त्याच्या भोंवतीं भिंगरी घालीत होती. विविध शृंगारविलसितांनीं त्याला वश करण्यासाठीं धडपडत होती. न जाणो हा एके दिवशीं नजर चुकवून निघून जाईल म्हणून तिनें त्या परिसराभोंवतीं कडक चौकी पहारे बसविले.

'ही अत्यंत आवेगानें विष्णूच्या गळ्यांत पडणाऱ्या प्रीतिविवश लक्ष्मीची मूर्ति तूं कुणासारखी कोरली आहेस?' तिनें त्याला एकदां विचारलें.

'लक्ष्मीसारखी.' त्यानें मूर्तीकडे पाहाताच उत्तर दिलें.

'आणि ही रुसलेल्या पार्वतीची'

'पार्वतीसारखी.'

'आणि तारुण्यमदानें उफाळणाऱ्या इंद्राणीची?'

'इंद्राणीसारखी'

'आणि ही लज्जेनें चूर झालेल्या रतीची!'

'रतीसारखी.'

'या चेहऱ्यामोहऱ्यांच्या स्त्रिया तूं कुठें पाहिल्यास?'

'कलासमाधींत.'

'माझ्यासारखी एखादी मूर्ति तूं कां कोरीत नाहींस?'

'कलासमाधींत आली असती तर कोरली असती.'

'मी सुंदर, तरुण आणि आकर्षक नाहीं का?'

'असशील.'

मंदिराच्या महाद्वाराचें, प्राकाराचें आणि सभामंडपाचें बारीक काम आतां पूर्ण झालें होतें, फक्त गाभाऱ्यांत कांहीं कलाकुसरी तो पूर्ण करीत होता. 'हें एवढें काम झालें कीं माझें काम संपेल.' पाठीशीं उभ्या असलेल्या राणीला तो म्हणत होता.

'कसें संपेल? मी तुझ्यावर मोहित झालें आहे हें तुला कळत नाहीं काय?'

'कळतें पण—'

'पण काय? कोण तुला प्रतिबंध करणार आहे?'

'कलेसाठीं घेतलेलें व्रत.—त्यापासून विचलित झालों, तर एक रेघदरेखील नेमकी आणि मोजकी मला ओढतां येणार नाहीं.

तीन दिवसांनीं त्यानें आपलें काम पूर्ण केलें. गाभाऱ्यांतील ओटयाच्या रेषा आणि कंगोरे सारखे करून त्यानें जवळ असलेल्या राणीला म्हटलें, 'हें मी आपलें काम संपाविलें. देवी आतां मला जायला अनुज्ञा दे. मी आपलें वचन पूर्ण केलें आहे.'

'हे काय? देऊळ पूर्ण झालें पण देव कुठें आहे?'

'घृष्णेश्वराहून उंच, विशाल, आणि सुंदर असें देऊळ निर्माण करीन असें मी कबूल केलें होतें. देव निर्माण करीन असें नाहीं.'

'या असामान्य शिल्पकाराला एक शिवलिंग आणि शाळुंका कोरतां येणार नाहीं?' तिनें लाडिकपणें त्याच्या कमरेला विळखा

घालून म्हटलें. त्यानें तिचे हात हलकेच दूर केले.

'येईल पण त्यांत देव निर्माण करतां येणार नाहीं. घृष्णेश्वर स्वयंभू आहे, कुणी निर्माण केला नाहीं, त्याचें महत्त्वहि तसेंच, अद्वितीय आणि चिरंतन.'

'मग तुझे सर्व श्रम, कला आणि सामर्थ्य व्यर्थ आहे' राणी चवताळून म्हणाली,'घृष्णेच्या देवाचेंच माहात्म्य रहाणार असेल तर तूं हें सगळें केलेंस कशाला?'

'मी आपलें वचन पूर्ण केलें.' तो शांतपणें म्हणाला.–

'काम, मोह आणि मत्सर यांनीं अंध झालेल्या एका लावण्यवतीला वांचविण्यासाठीं मी आपली कला राबविली, सामर्थ्य भ्रष्टविलें. घृष्णादेवीसारख्या परमभक्त सतीचें नांव त्या स्वयंभू महादेवानें घेतलें याचें वैमनस्य कां धरतेस?'

पण तिनें त्याला जाऊं दिलें नाहीं. अनेक वेळां, वेळीं अवेळीं पळून जाण्याचा प्रयत्न करूनहि दूर दूरवर ठेवलेल्या दक्ष पहारेकऱ्यांनीं त्याला राणीपुढें आणून उभें केलें.

जळजळणाऱ्या कामवासनेबरोबरच वैफल्य आणि द्वेष यांनीं त्या दुरभिमानी आणि दुराग्रही राणीच्या मनांत थैमान केलें होतें.

'अपार वैभव आणि तरुणसुंदर कामिनीला लाथाडून तूं कुठें जाणार आहेस?'

'कुठेंहि रानावनांत–एक क्षणसुद्धां इथें रहावेसें वाटत नाहीं.'

'आणि करणार काय?'

'कलेची उपासना–पवित्र आणि मंगल तपस्या–सामर्थ्याच्या उन्मादानें केलेल्या प्रमादाचें क्षालन.'

राणीनें मनाशीं खूणगांठ बांधली. रानावनांतहि हा एखादी याहून भव्य शिल्पकृति निर्माण करूं शकेल. छे:; हें होतां कामा नये. या दैवी सामर्थ्याच्या कलाकाराचा अध:पात झालाच पाहिजे. कांहींहि काम न

राहिल्यामुळें लाचार झालेला हा अजब बंदी. तिनें त्याचें खेळणें केलें. स्वयंभू महादेवाच्या मंदिरांत किंवा शेजारच्या गुंफेंत देखील ती त्याला एकांत मिळूं देत नसे. ती राणी होती. कुणाचेंहि भय किंवा लाज बाळगण्याचें तिला कारण नव्हतें. लोकांना तिच्या उत्शृंखल वागण्याचा वीट आला पण सत्तेपुढें तेहि लाचार होते. एकीकडे असा छळ आणि दुसरीकडे लाडीगोडी, विनवणी, मनधरणी. तो पाथरवट अगदीं अगतिक झाला. त्याला कळून चुकलें कीं राणीचें मनोरथ पूर्ण केल्याशिवाय आपली सुटका नाहीं. त्याला कांहीं सुचेना, जगावें कां मरावें. या विचारांतच जगण्याला एकमेव साधन असलेल्या राणीच्या अंगसंगाचें कामुक भाव नकळत त्याच्या मनांत शिरूं लागले. संयमानें ते दूर लोटले तर त्याच्या विशाल मनाचें दालन ओकें ओकें राहूं लागलें.

शेवटीं तो हताश झाला. आपण होऊन एके दिवशीं त्या भव्य शिलाकृतीच्या महाद्वारांत आला. राणी त्याला सामोरी गेली. तिला वाटलें, मासा गळाला लागला. महाद्वारावर कोरलेल्या सुंदर गणेश मूर्तीवर त्याची नजर होती.

'नाहीं, मीच निर्माण केलेल्या देवादिकांच्या या पवित्र प्रतिमांच्या साक्षीनें हें पाप–नाहीं मजकडून होणार नाहीं. देवी, दया कर. मला जाऊं दे.'

'तूंच जीवदान दिलेल्या या नाजुक देहावर तुझीच मालकी आहे. तुझ्या व्रताची सांगता या कलानिर्मितींत झाली आहे. त्याचें पारणें तुला येथेंच फेडलें पाहिजे. या रंगमहालापेक्षां अधिक सुंदर कांहीं तुझ्या हातून घडूं नये म्हणून तरी–'

'नाहीं, नाहीं, हें शक्य नाहीं.' असें म्हणून त्यानें आपलें मुख दोन्हीं हातांनीं झाकून घेतलें. राणीच्या वक्षःस्थलाच्या उष्ण स्पर्शानें त्याला घेरी आल्यासारखें झालें. निश्चयानें स्वताःला सावरण्याचा विचार सुचला त्या वेळीं आपण गाभाऱ्यांतील ओट्यावर आहोंत, आणि

राणीच्या गोऱ्यापान ऊबदार तुकतुकीत देहानें सर्वांगाला विळखा घातला आहे असें त्याला आढळून आलें. मग मात्र त्याचा संयम सुटला. जें व्हायचें तें झालें !

दुसरे दिवशीं राणी माणकावतीचा मृतदेह गाभाऱ्यांतलि ओट्यावर अस्ताव्यस्त पडलेला तिच्या दासींना दिसला आणि एकच आकांत उडाला. त्या गडबडींत तो पाथरवट कुठें नाहींसा झाला याचें कुणालाच भान राहिलें नाहीं. कुणालाहि तो पुन्हां कधींहि दिसला नाहीं. राणीच्या मुद्रेवर इच्छापूर्तीचें समाधान होतें. कुंतलाधीश सातवाहन शातकर्णी याच्या अविचारानें जसा अतिनाजुक महादेवी मलयवती इचा जीव गेला तसाच त्या दणकट पाथरवटाचा झपाघात काळजाला भिडून या अतिनाजुक माणकावतीचा प्राण गेला.

कृष्णराज श्रीवल्लभ यानें पुढें या माणकेश्वराच्या देवळांत शिवलिंगाची स्थापना करविली. पण शंभर वर्षांनीं वीज पडून त्याचे महाद्वार उध्वस्त झालें. राष्ट्रकूटांचें राज्य धुळीला मिळाल्यानंतर शंभर वर्षें तो सर्व प्रदेशच उध्वस्त, निर्जन व अरण्यमय राहिला. समुद्रकांठच्या वाळूवरील लाटांप्रमाणें काळाचें आपलें चाललेंच आहे— जुन्या खुणा पुसायच्या, नव्या खुणा उठायच्या !

दैवी सामर्थ्याच्या त्या अलौकिक शिल्पकाराचें नांव 'दुमार' असें होतें. झऱ्याशेजारची त्याची ती गुंफा अजूनहि 'दुमार लेणें' म्हणून ओळखली जाते.

## जगायचयू मला!

जगायचयू मला! त्यावेळी तो एकच विचार माझ्यापुढें होता.

कसंहि करून जगायचं! जगून काय करायचं हा विचार केव्हांच आला नाहीं. तो करण्याची पात्रताहि नव्हती त्यावेळीं आणि आजहि नाहीं ती!

आजचा विचार वेगळा आहे. मरून तरी काय करायचं हें जोंवर निश्चित नाहीं तोंवर जगायला काय हरकत आहे? अशी आजची भूमिका आहे. पण वाटेल ती घडपड करून जगलेंच पाहिजे; नाहीं तर—नाहीं तर काय हे माहीत नाहीं म्हणून जगायचें अशी त्यावेळची भूमिका होती.

मरणाची भीती? छे:—ती नव्हतीच. मरण नैसर्गिकपणें जवळ येऊं लागलें म्हणजे वार्धक्यांत त्याची भीती उत्पन्न होते. ऐन विशीच्या वयांत ती कधीच भेडसावीत नाहीं. मग काय जगायची हाव? छे: तीहि नाहीं. तीहि वार्धक्यांतच सुटते. ओळखीची झालेली पण न लाभ-

लेलीं सुखें—त्यांची आशा माणसाला सोडीत नाहीं. आणखी आणखी जगावेंसेंच वाटते. जगणें अपुरें राहिलेलें असतें ते कधींच पूरें होत नाहीं— फक्त संपतें.

पण त्या ऐन विशींत तरी मला जगण्यासारखे असें जगांत काय होते? जगायचं ही भावना होती; 'कां' हा विचार नव्हता. आणि भावनेवरच मनुष्य जगतो. विचाराचा विचारच करीत नाहीं.

असे माझ्यासारखे कैक असतील कीं ज्यांच्या जगण्याची कुणालाच तादृश गरज नाहीं. असे असंख्य लोक जगण्यासाठीं सारखे धडपडतात. झुरळांनी भरलेले डबडे आंगणात आणून उपडे केले कीं त्यांतील जीवानीं अनेक दिशांना कुठेतरी आसरा शोधण्यासाठीं धावावे अगदीं तसेच.

निदान त्या जंक्शनच्या प्लॅटफार्मवरील धावपळ पाहून तरी मला तसें वाटलें. गाडया चिक्कार भरून येत होत्या नि जात होत्या. माणसें धांवत होतीं, धडपडत होतीं, घुसत होतीं, एकमेकांवर बसत होतीं, चिरडत होतीं, मागें रहात होतीं, शिव्याशाप देत होतीं; आणि पुन्हा धांवत होतीं—गाडींत बसून, उभे राहून, पडून, झडून, कसेतरी आणि कुठेंतरी जाण्यासाठीं.!

असाच मी आलों होतों. कुठून तरी आणि कुठेंतरी. कसतंरी जगायचंय् म्हणून. कुठें जायचें आणि कां जायचे हें माहीत नव्हते. काय करायचें हें निश्चित नव्हते. घरून निघालों; स्टेशनवर आलों; गाडीत बसलों; ती गाडी या जंक्शनवर रिकामी झाली. उतारूंची झुंड दुसऱ्या कुठेंतरी जाणाऱ्या गाडीकडे धांवली. आधींच चिक्कार भरलेल्या डब्यांच्या खिडक्यांतून कांहीं लोक शिरले. सामान आणि माणसें यांचा एकच कचका झाला. बाकीचे फलाटावर राहिले. गाडी निघून गेली. आणि कांहीं वेळानें दुसरी अशीच ठेचून भरलेली गाडी आली.

लहानपणीं आपल्या आईबरोबर मामाच्या घरीं जात असे

त्यावेळीं हा गर्दीगोंधळ नव्हता. खुशाल झोंपून लोक जात असत. असाच एकदा झोपेंत बाकावरून खालीं पडून घरंगळत मी बाकाखालीं जाऊन दिसेनासा झालों होतों आणि आई घाबरी झाली होती. आई मरून गेली आहे; मामाचे घरहि मला राहिलेलें नाहीं.

लोक म्हणत कीं लढाई सुरू झाल्यापसून या आगगाडींतील गर्दीला सुमार राहिला नाहीं. मला त्यावेळीं वाटे :–" इतकीं माणसें एकदम कुठून आलीं ? लढाईनें गर्दी कमी व्हावी." लढाईच्या वेगाबरोबरच स्वातंत्र्याच्या घातपाती चळवळीचा वेगहि म्हणे वाढत होता. कोणती गाडी केव्हां कुठें कोसळेल याचा नेम नव्हता. असा धोका होता. तरी पण मुंग्यासारखी माणसें गाडयांना चिकटून राहिली होती. कुठून तरी कुठेंतरी नेलीं जाण्यासाठीं फिरत्या फुंकणीला पोपटानें चिकटून रहावे तसे !

याच गाडयांतून किती तरी डबे सैन्यासाठीं राखून ठेवलेले असत. त्यांत गर्दी नसे. इतकी ठेचाठेच पण कोणाला अशा डब्यांतून येऊं दिले जात नसे. आणि कोणी जायला धजतहि नसे. शिवाय सैनिकांच्या स्पेशल गाडया धांवत त्या वेगळ्याच. मला त्या वेळीं वाटायचें:– " सैन्यांतल्या लोकांचे आपलें बरें. प्रवासांत गर्दीचा त्रास नाहीं."–पण मी सैनिक व्हायला तयार नव्हतों, कारण मला जगायचें होते. हे आरामशीर प्रवास करीत जाणारे शिपाई कुठें तरी मरण्यासाठींच जात असले पाहिजेत.

विविध प्रकारच्या लोकांनीं गजबजलेल्या त्या जंक्शनच्या प्लॅटफार्मवर मी पुढें काय याचा विचार करीत बसून राहिलों. खेचाखेच गर्दींत दिवसरात्र उभा राहून मी विनातिकिट आलों होतों. तिकिटासाठींच काय पण कशासाठींच मजजवळ एक कपर्दिकहि नव्हती. त्या वेळीं मला वाटलें:–"जन्मापासूनच आपलें चुकले आहे !" ज्यांची अलीकडे लोकांनां गरजच राहिली नाहीं अशा वैदिकाच्या कुळांत माझा

जन्म झाला. दशग्रंथी, सोमयाजी, घरंदाज म्हणून आपली मुळगी देऊन एका गरीब कारकुनानें वडिलांचा संसार उभा केला नसता तर मजवर जन्म घेण्याचा प्रसंगच न येता. लौकिक शिक्षणासाठीं पैसा नव्हता आणि सोयहि नव्हती; आणि वैदिक विद्या कितीहि घोकली तरी माझ्या मुखीं बसलीच नाहीं. गांवोगांवीं फिरून वडील कांहीं मिळवून आणीत. आणि घरांत ते खर्चून जाई असे चालले. लवकरच आई बाळंतपणांत मेली आणि याचें दार त्याचें दार करीत मी वाढलों. पण धान्यटंचाईनें अलीकडे सर्वांना घाबरे केलें होतें, कुणी जेवायलाही बोलवीना आणि याचना करणें वडिलांच्या स्वाभिमानाला मानवले नाहीं. होतें नव्हतें तें सर्व सरतां सरतां वडील दोषी तापानें आजारी पडले. डॉक्टर होते पण लढाईमुळें औषधेंच मिळत नव्हतीं. शेवटीं त्यांचे और्ध्वदेहिक करून आणि जवळचा शेवटचा पैसा गोप्रदान म्हणून ब्राह्मणांच्या हातावर ठेऊन मी गांव सोडलें. अंगावरच्या कपडयांशिवाय मजजवळ कांहीं नव्हते. जगायचें होतें मला पण कसें तें मात्र कळत नव्हतें.

संध्याकाळ झाली होती, वर उंच आभाळांत पाखरांचे थवेच्या थवे जात होते. कुठून तरी कुठेतरी ! जगण्यासाठीं, आसरा घेण्यासाठीं, सुरक्षिततेसाठीं; घाईनें आणि जमावानें, उलटसुलट दिशेनें, अंधार पडेपर्यंत मी त्यांच्याकडे पहात बसलों. वाटलें: —

" पाखरांचे आपलें बरें. कुठेतरी आसरा मिळतो; कुठून तरी चारा मिळतो. "

माझ्या पोटांत दोन दिवसांत अन्नाचा कण नव्हता. फलाटाच्या नळावर पोटभर पाणी प्यालों, काय करावें? कुठें जावें? कुणाला काय म्हणावें?

थोडयाच वेळांत फलाटावर चिक्कार गर्दी झाली. उतारू, सामान, हमाल, फेरीवाले, आणि भिकारी, सर्वांचीच. एक्स्प्रेस गाडी यायची

होती. लहान स्टेशनें गाळणारी, वेगानें धावणारी, ठचाठेच भरलेली. मोठया शहरांच्या मूळच्याच धमाल गर्दीत आपलें ओझें ओतणारी; मलाहि असेंच कुठें तरी जायला हवें होतें. गर्दीत मिसळून विरून जाण्यासाठीं,—आणि कसेंतरी जगण्यासाठीं.

गाडी आली— फुसफुसत— धडधडत— थांबली. उतारू ओझी घेऊन पळूं लागले, धांवले, धडपडले, आणि जागा नाहीं म्हणून निराश झाले. लांबच लांब गाडी पण तींत बहुतेक सैन्याचे डबे आणि वरच्या वर्गांचे राखीव डबे, शिवाय जेवण्याचे नि झोपण्याचे.

एका सैन्याच्या डब्यासमोर मी उभा होतों. मोजकेच पंजाबी सैनिक त्यांत होते. कुणी लोळत होते, कुणी फिरत होते. कुणी दाराशी बसून आंत शिरूं पाहणाऱ्या अडाणी उतारूंना दटावीत होते. कुणी खात पीत होते आणि कुणी सिगारेटचा धूर सोडीत होते. भिकारणी नि त्यांची पोरें डब्याच्या दाराशीं गर्दी करून होतीं. त्यांनीं फेकलेले पावाचे तुकडे झेलण्यासाठीं; त्यांनी टाकलेलीं सिगारेटचीं थोटकें उचलण्यासाठीं; आणि त्यांनीं उदार होऊन दिलेला पैसा घेण्यासाठीं. प्लॅटफॉर्मवर फिरून परत डब्यांत शिरणाऱ्या एका दांडग्या शिपायानें मारून पिटून त्यांना हाकालले. पण एक तरुण भिकारीण गेलीच नाहीं.. असेल सतरा आठरा वर्षांची. अंगावर मळकट लक्तरें; धड हिंदुस्थानी नाहींत धड दाक्षिणी नाहींत, केसांच्या जटा, चेहरा मात्र रेखीव, रंग उजळ; लाचार, लोचट, आणि बेछूट.

त्यांची बोलाचाली मला नीट ऐकू आली नाहीं. पण बहुतेक ती त्याला पैसे मागत असावी. तो तिला पाचकळपणानें कांहीं तरी म्हणत असावा. कारण बाकीचे शिपाई खो खो हंसत होते. ती तावातावानें त्याला उत्तरें देत होती. इतर शिपाई चेष्टा करीत होते.

इतक्यांत त्यानें तिला डब्यात ओढली आणि आवळून धरली. ती त्याच्या हातून सुटण्यासाठीं आतोनात धडपडली; पण व्यर्थ.

फलाटावर दूर उभी राहून दुसरी एक भिकारीण ओरडत होती. डब्यातले इतर शिपाई या अतिप्रसंगाला उत्तेजन देत असलेले दिसले. त्यानें बाकावर बसून तिला मांडीवर घेतले आणि धडपड करतांना तिचे पाय वर झाले. फाटक्या लक्तरांत लपविलेली तिची लाज—

पण मला काय झालें कुणास ठाऊक मी एकदम डब्यांत शिरलो आणि 'सोड तिला' असे म्हणत झोंबाझोंबी करू लागलों. मला येत असलेलें आणि आठवलेले अपशब्दही मी उच्चारले असले पाहिजेत. दुसऱ्या एका गलेलठ्ठ कल्लेवाल्या शिपायानें माझें मानगुट धरलें. गदगदा हालविले तेव्हांच हाडे खिळखिळी झालीं. मला माहीत नसलेल्या किती तरी शिव्या त्यानें हंसडल्या. त्या तरुण भिकारणीची त्या अडदांड माणसाच्या हातून सुटण्याची जिवापाड धडपड चालूच होती. कुणीतरी डब्याचे दार बाहेरून धाडकन बंद केलें. ते उघडण्यासाठीं मी जाऊं लागलों तो दुसऱ्या एका शिपायाचा दणका लागून समोरच्या दाराशीं कोलमडलों. इतक्यांत गाडीनें शिट्टी दिली. मी धडपडत उठतों तोंच गाडी चालू झाली दाराशीं बसलेल्या दोन शिपायांनीं दार उघडले आणि मला अलगद बाहेर रेल्वे लाईनवर टाकून दिले.

मी शुद्धीवर आलों तेव्हां स्टेशनांत सामसूम होते. मी दोन लाईनीच्या मधल्या जागेत पडलों होतों. आणि तीच तरुण भिकाऱ्याची मुलगी माझ्याजवळ बसली होती. सैन्यांत शिपायांना पाणी पिण्यासाठीं देतात तसल्या मोठ्या तामाचिनीच्या बंपरमधून मला पाणी पाजीत होती. आणि विचारीत होती:– "कुठें लागलें कां ?"

विशेष लागले नव्हते. बरेंच खरचटलें होतें. अंग सडकून हबकलें होतें नि ठणकत होतें. मला ग्लानी आहे असे पाहून ती मला आणखी पाणी देऊं लागली. तेव्हां मी तिला सांगितलें कीं:– "दोन दिवसांत माझ्या पोटांत कांहीं नाहीं." तिनें आपल्या लक्तरांतून एक पावाचा

तुकडा काढून दिला. मला तो कसासाच लागला. पण तेवढें खाल्या-मुळें हुषारी वाटूं लागली. कांहीं वेळानें हलकेंच उठवून, लाइनी ओलांडून तिनें मला पलीकडच्या फलाटावर नेले आणि म्हटलें:–

" इथें आतां रात्रीं गाडी येणार नाहीं."

तिथें मी तिला विचारलें:– " त्या सैतानाच्या हातून तूं कशी सुटलीस ?"

" मला कोण काय करणार आहे ? पण तूं त्यांच्या डब्यांत शिरून त्यांना शिवीगाळ कां केलीस ?"

" तुझ्यावर ते जबरदस्ती करीत होते ना ! "

" छट्‌ !– गाडी चालूं होतांचत्यांनीं मला सोडून दिली. आणि शिवाय हें पाणी प्यायचे भांडेहि मी मिळाविलें."

हें ऐकून मी गारच झालो. उगाचिच मी आपली हाडें मोडून घेतली तर !

" पण तुला कुठें लागलें तर नाहीं ना ? " तिनें पुन्हां विचारलें.

" नाहीं, उगीच थोडेसें."

" मग तूं इतका थकलेला का दिसतोस ? "

" भूकेमुळें "

" थांब हं मी तुला कांहीं तरी खायला आणते.' असें म्हणून ती निघून गेली. कांहीं वेळानें तिनें थोडेसें अन्न आणलें. काय कसें याची चौकशी न करतां तें मी खाल्लें. तिच्याच त्या टमरेलांतून पाणी प्यालों. तिनें कांहीं प्रश्न विचारलें आणि मी कांहीं उत्तरे दिली. पण ती अर्धवट झोंपेतच. मला झोंप लागलेली पाहून ती निघून गेली असावी.

सकाळीं मी जागा झालों तो झाडूवाल्याच्या हांकेनें, फलाट झाडायचा होता त्याला. फट्‌ उजाडलें होतें. डोळे उघडून मी पाहिले. तों चक्क कचऱ्याच्या ढिगाऱ्यांतच मी झोंपलों होतों. झाडूवाला माझ्या

अंगावर केर टकलीत होता आणि तोंडानें मला भूपाळी म्हणत होता. रेल्वेचा फलाट माझ्या बापाची मत्ता असल्याचा शोध त्या ओघांत मला लागला. पण ती सोडून जाणें मात्र भाग होतें. मागेपुढें घरंगळणारे मालाचे डबे चुकवीत रूळ ओलांडून स्टेशनमागील मैदानांत आलों. सर्व दिशा माझ्या दृष्टीनें सारख्याच होत्या. कुठें तरी जायच होतें मला आणि कसेंतरी जगायचें होतें.

सरळ जाणाऱ्या रस्त्यानें मी गेलों आणि दुपारपर्यंत बझार भागांत हिंडलों. चारदोन ठिकाणीं कुणाला कांहीं मागायचें धैर्य केलें. पण फक्त झिडक्याच मिळाल्या. एका फाटकांत नळ दिसला त्यावर स्नान करावें म्हटलें, तर मालकानें माझ्यावर भलें मोठें कुत्रेंच सोडलें. वणवण भटकून परत स्टेशनकडे आलों. भूकेनें व्याकूळ केलें होतें. स्टेशनमागील मैदानांत एका मोठया चिंचेच्या झाडाखालीं मी उभा होतों. तों तीच कालची तरुण भिकारीण येतांना दिसली. आपल्या अंगावरील मळकट फाटकें लक्तर फडकवीत ती मजकडे येत होती.

" कुठें होतास इतका वेळ ? " ती जवळ येऊन म्हणाली.

" पोटासाठीं वणवण भटकत."

" मिळालें कां कांहीं ? " तिनें आपुलकीनें विचारलें.

" नाहीं."

" मलाहि कांहीं मिळालें नाहीं. जमादारानें मला आज चोरीच्या संशयावरून ठाण्यावर बसवून ठेवलें. खायला दे म्हणून आरडा ओरडा केला तेव्हां सोडलेन्."

मलाहि कांहीं तरी पोटांत भरायला हवें होतें. जगायचें होतें मला ! तसें मी तिला बोलून दाखविलें,

" मीहि आज दिवसभर उपाशीच आहे. जवळ कांहींहि नाहीं. पण मजबरोबर चल. कांहींतरी मिळेल आपल्याला.' ती म्हणाली.

तिनें झाडाच्या दोन फांद्या तोडल्या आणि पानें तोडून टाकून

त्याच्या दोन लांबसडक काठया बनविल्या. एक माझ्या हातीं देऊन म्हटले :– ‘ हं ऽ चल ऽ.’ ती कुठें नेणार आणि काय करणार याची कल्पना नसतांनाहि मी तिच्या मागें गेलों. पण मला फारसें चालावें लागलें नाहीं. आडवळणानें जाऊन ती काटेरी तारांच्या पुरुषभराहून उंच अशा एका कुंपणाजवळ थांबली. कुंपणाच्या आंत पन्नास पावलांवर एक टिनशेड आडवी पसरली होती आणि पलीकडचें कांहींच दिसत नव्हते. कुंपण दाट तारांच्या काटेरी जाळीचे होते आणि त्याबाहेर बरीचशी मोकाट जनावरे नि कांहीं कुत्रीं उभीं होतीं.

इकडून तिकडे नेल्या जाणाऱ्या सैन्याला त्या जंक्शनवर अन्न पुरविण्याचे कंत्राट कुणीतरी घेतले होतें. त्यासाठीं ती शेड आणि ते कुंपण होतें. तिथें टनांनिशीं गव्हाच्या रोटया भाजल्या जात, मारवल्या जात; उरल्या, शिळया झाल्या किंवा सैन्याला खाण्याला अयोग्य ठरल्या म्हणजे त्या कुंपणावरून बाहेर फेंकल्या जात. त्यावर ती मोकाट जनावरें पोसून माजलीं होतीं-

‘आपल्या हातांतील फांद्यांचें फोंक सरसावून सज्ज रहायचें. कुणी तरी टोपली भरून आणून कुंपणावरून फेंकली कीं जनावरें व कुत्रीं खायला धांवतात त्यांना मारमारून पिटाळायचें आणि टाकलेल्या ढिगाऱ्यांतील रोट्या वेचून चटकन् झोळींत भरायाच्या’ असें तिनें बजावून ठेवलें होतें. पण प्रसंग आला तेव्हां ती माजलेलीं जनावरें आणि लोचट कुत्रीं यांनीं माझ्या झोडपण्याला मुळींच दाद दिली नाहीं. सरळ मुसंडी मारून घुसलेल्या बैलांच्या सांपटींत सांपडून मी चेंगरलों, माझी दामटी वळली आणि एका कुत्र्यानें माझे धोतर फाडून नेलें. त्या तरुण भिकारणीनें मात्र आपली झोळी गच्च भरून घेतली होती.

‘सैन्यासाठीं बनविलेल्या या रोट्या शरीराला चांगल्या मानवतात.’ तिनें सांगितले, ‘बघ तीं गुरं कशीं तुस्त झालीं आहेत!’

स्टेशनमागील मैदानांतल्या त्या झाडाखालीं बसून त्या टाकून

दिलेल्या रोटया आम्हीं दोघांनीं खाल्या. फलाटावरील नळावर पाणी पिऊन दादराखालीं इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बसलों.

टाकलेल्या अन्नावर पोसलेला तिचा देह भरल्यापोटीं वासना जागी करण्याइतका रसरशीत होता हें मला त्यावेळीं जाणवूं लागलें. पहिली भूक भागली कीं दुसरी भडकते. दादराखालीं ती मला अगदीं खेटून बसली होती. उरली सुरली लज्जा झांकण्याची तिला गरजच भासत नव्हती. मी स्वतःला बजावीत होतों: 'मोकाट पशूंच्या तोंडचा घांस खाऊन तू पशू बनलाच आहेस. आतां पशूसारखें वर्तन करून त्याचा सांगता कर. आणि पुढेंहि पशूप्रमाणेंच वाग. जगायचें आहे ना तुला ?' पण मी तिला म्हटलें :– 'हें असें जीवन तूं किती दिवस जगत आहेस ?'

'जन्मापासून. माझी आई पण अशीच जगली नि अशीच मेली.'

वासनेनें मनाचा ताबा घेतला होता. दुसरा प्रश्न मी विचारला:– 'त्या शिपायानें काल आणला तसा प्रसंग तुझ्यावर वारंवार येत असेल.'

'अलीकडे रोजच येतो.'

'मग तूं काय करतेस ?'

'कांहीं नाहीं, त्याचा जास्तींत जास्त फायदा घेते.' माझे अंग शहारल्यासारखे झाले. थोडीशी पाठमोरी होऊन ती मला म्हणाली:—

'तूं या कामांत अगदींच नवशीक दिसतोस. अजून पदर आला नव्हता तेव्हांपासूनच मला सर्व गोष्टी संवयींच्या झाल्या आहेत. अनुभवानें शहाणपण आले आहे. कुणी माझ्या अंगाला हात लावला तर त्याला त्याची भरपूर किंमत द्यावी लागेल.'

तिच्या पाठीवर ठेवण्यासाठीं मी आपला डावा हात पुढें केला होता तो वीजेचा झटका बसल्यासारखा मागे आला. किंमत द्यायला मजजवळ होते काय ?

आदले रात्रीं शिपायांनीं तिला गाडींत ओढली तेव्हां फलाटावर शिव्या देत उभी होती ती भिकारीण तेथे आली आणि तिला म्हणाली " कोण गं हा ?"

'तुला काय करायचय् ? आपल्या वाटेनं जा' तिला उत्तर मिळाले. पण ती गेली नाहीं. माझ्या दुसऱ्या बाजूला खेटून फतकारा मारून बसली. आणि म्हणाली:– 'अलीकडे तूं रीतभात अगदीं सोडली आहेस. बेफाम झाली आहेस. घोका खाशील."

'तूं मला शिकवायला नको गं मावशे. मी कुकुलं बाळ नाहीं.'

'तुझी आई पण अशीच होती. मोकाट उंडारलेल्या पाडीप्रमाणें–'

'असेल ! जगायचं होतं तिला !'

'पण मेली की !'

'तूं मरणार नाहींगऽ– होयगं मावशे ?'

'दिसेल त्याला जवळ करीत नाहीं मी' तिनें मजकडे पहात म्हटले.

'मीहि नाहीं करीत.'

'मला काय दिसत नाहीं ! तुझ्याहून चार पावसाळे जास्त पाहिले आहेत.'

'मीहि पण पुष्कळ जग पाहिलं आहे.'

त्यांची ती सांकेतिक भाषा मला नीटशी कळली नाहीं. अशा या जीवनांतहि रीतभात; अनुभवाची शिकवण; व्यवहाराचे संकेत. एक्सप्रेस यायची घंटा झाली म्हणून त्या फलाटावर धावल्या. मीहि त्यांच्या मागोमाग गेलो. असें किती तरी जीव या लाईनीवर जगत होते. धर्म नाहीं, जात नाहीं, घरदार नाहीं, काम नाहीं, जबाबदारी नाहीं. केवळ जगायचं, आपल्यासारख्यांची संख्या वाढवावयाची, आणि मरायचं.

जगायचय् मला! पण ते असं नव्हे. तरी मी तसाच जगलों. दुसऱ्या रीतीनें जगायला मी लायक कुठें होतों? त्या रात्रीं त्या तरुण भिकारणीनें मला आपल्या बिऱ्हाडी आश्रयाला बोलावले तेव्हां मी तिच्या मागोमाग गेलें। खरा. मोडून गंजून अगदीं निकामी झाल्यामुळें आडबाजूला टाकून दिलेल्या एका मालडब्याच्या आडोशाला चारदोन गाडगीं; चारदोन लक्तरें आणि चारदोन टिनची डबडीं!

'हे माझें घर आणि तूं माझा पाहुणा' तिनें बजाविले.

'हूं ऽ'.

'आई मेली, बहीण पळून गेली, लहान भाऊ कुठेंतरी असतो.' तिनें सांगितले. मुन्नी तिचें नांव. आई मुसलमान असावी तिला बानू म्हणत. बाप कोण तिला माहीत नाहीं. लाचार दिसावें आणि बेगुमान वागावें, मिळेल तें खावे आणि झोंपावें. इतकेंच तिला माहीत होतें. खादी, खाकी, रेशमी किंवा लोंकरी वस्त्रांआड दडलेल्या कामांध पशुत्वाशीं कसा सामना द्यावा हें कसब तिला अनुभवानें—अनेक वेळां आपल्या स्त्रीत्वाचें हवन केल्यानें—आले होतें.

त्या मालडब्याच्या आडोशाला एका तुटक्या टाकून दिलेल्या चटईवर आम्ही दोघेंहि झोंपलों. बोलतांबोलतां तिला झोंप लागली. पण मला कांहीं केल्या झोंप येईना. माझें मन वासनेनें भडकले—ती जेव्हां झोंपेंत माझ्याकडे वळली तेव्हां तिचा उष्ण श्वास अगदीं माझ्या तोंडावर फुंकरून माझी वासना आणखी चेतवूं लागला. कुशीवर वळावें, उठून जावें, किंवा या आगींत झेंप घ्यावी असे तीन पर्याय मला सुचले. त्यांतला तिसराच बरा वाटला. पण मी तिच्या अंगावर हात टाकतांच ती जागी झाली आणि म्हणाली. 'कां? तुला झोंप येत नाहीं का? त्या गाडग्यांतलें पाणी पी आणि नीज़.'

मी तसें केलें आणि जरा दूर सरून वळून झोंपलों. झोंप आलीच नाहीं. मालडबे जोडणाऱ्या इंजिनाच्या शिट्या; आणि भगभग

भुसभुस मोजीत राहिलों. अंग अवघडलें म्हणून उताणा झालों; उठून बसलों, पुन्हा पाणी प्यालों, पुन्हां झोंपलों. अशीच रात्र गेली. पहाटचा गार वारा सुटला तेव्हां सहज झोपेंतच तिनें माझ्या अंगावर हात टाकला. मी तो मोठ्या अधाशीपणानें कवटाळला आणि नंतर मला गुंगी आली.

उजाडलें तेव्हां माझें सगळें अंग ठेचल्यासारखें ठणकत होतें. भयंकर ताप भरला होता माझ्या अंगांत. हुडहुडी भरली होती, डोळे जळजळत होते, डोक्यावर कुणी तरी घण मारीत होते. तिनें माझ्या हाताला हात लावून पाहिला, सगळीं लक्तरें माझ्या अंगावर टाकलीं आणि न बोलतां ती निघून गेली.

दोन दिवस म्हणे मी जवळजवळ बेशुद्धच होतों. ती मावशी म्हणवणारी माझ्या उशाशी बसून होती. झाडपाला वाटून पिळून त्या दोघी मला पाजीत होत्या. आणि कुठलें तरी औषध आणूनहि. माझें दुखणें बरेंच लांबलें. पण कसा देव जाणे बरा झालों. त्या दुखण्यांत माझ्यासाठीं मुन्नीनें काय काय केलें तें एक देवच जाणे असें ती मावशी म्हणे. मला काय कळत नव्हते काय केले असेल ते ?

मी चांगला बरा झालों पण तिनें मला आपल्याबरोबर भीक मागायला हिंडू दिलें नाहीं. सांगितलें:—

‘ तूं आमच्यासारखें जगूं शकत नाहींस. चार दिवस थांब. मी तुझ्यासाठीं चांगलें कपडे मिळवून आणते. ते घालून तूं गुत्तेदाराकडे जा. आपलें मूळ नांव गांव सांग. तो तुला पोळ्या करण्याचें काम देईल. त्याला माणसांची गरज आहे. तूं आमच्यांत होतास हें विसरून जा.’

‘ चांगले कपडे तूं कुठून आणणार ? चोरून ?’

‘ कपडे मला कोण आणि कशासाठीं देईल हे तुला चांगलें कळतें.’

'कांहीं नको. मी असाच भीक मागून तुझ्याबरोबर जगेन.'

'नाहीं. तुला ते जमणार नाहीं. असें जगायला पशु बनावें लागतें. तुझा पिंड तसा नाहीं.'

'असें तूं कसें म्हणतेस ? काय लायकी आहे माझ्यांत ?'

'नाहीं. तूं पशू बनू शकत नाहींस हें मी पहिल्या रात्रींच जाणले.' ती समोर पहात म्हणाली, 'रात्रभर विषयानें तळमळत राहिलास पण– नाहीं, तूं आमच्यांत जगणार नाहींस. जगायचंय ना तुला ?

चार दिवसांनी तिनें दोन धोतरे, दोन सदरे, सतरंजी, चादर, पांघरूण, पंचा, लोटा असे सामान आणले आणि मला म्हटलें:–
'आत्तांच जा. तुला गुत्तेदाराकडे काम मिळेल. नुकताच गांवाहून आलों असें सांग. पुन्हां मजकडे येऊं नकोस.'

नळावर स्नान करून ते मी अंगांत घातले. बाकीच्या कपड्यांची वळकटी केली. काखेंत वळकटी आणि हातांत लोटा असा मी निघालों तेव्हां सोडमुंजीनंतर काशीयात्रेला निघालों होतों त्याची आठवण झाली. मामानें मला मुलगी देतो म्हणून परत बोलावलें होते. आज ही तरुण मुलगी माझी पाठवणी करीत होती आणि बजावीत होती:– 'परत येऊं नकोस.'

कांटेरी तारेच्या कुंपणापर्यंत ती मजबरोबर आली आणि तेथें तिनें मला थांबविलें. पोटाशीं खोंवलेली पुरचुंडी सोडून मळक्या नोटा आणि नाणीं मिळून नऊ रुपये तिनें माझ्या हातांत दिले आणि म्हटलें: —

'परगांवाहून नौकरीसाठीं आलास आणि जवळ पैसा नाहीं म्हटलेस तर गुत्तेदार संशय घेईल. सांभाळून ठेव. जपून वाग. माझी भीकेची सर्व कमाई मी तुला दिली आहे. जा आतां. वळून पाहूं नकोस.'

मी ते पैसे घेण्याचें नाकारले तेव्हां ती म्हणाली:–

'हे तुला घेतलेच पाहिजेत, तुझ्या जगांत पैसे हे जवळ असलेच पाहिजेत. जगायचय् ना तुला ?'

कॅन्टीनमध्यें मला काम मिळालें आणि माझें ठीक चालूं लागलें. पण ती मला भेटली किंवा दिसली नाहीं. पहिला पगार मिळतांच तिचे पैसे व कपडे परत करण्यासाठीं मी तिच्या ठिकाणावर गेलों पण तेथें कांहींच नव्हते. स्टेशनांत तिला गांठण्याचा खूप प्रयत्न केला. पण ती मला चुकवीत असावी.

तीन महिन्यानंतर तेथून कॅन्टीन उठलें आणि मला तें गांव सोडावें लागलें. मुन्नी एकदां जी माझ्या दृष्टीपुढून गेली ती गेलीच; पुन्हां दिसली नाहीं. सहा महिन्यांनीं माझें काम सुटलें आणि मी बेकार झालों. पण मला भिकारी व्हावें लागलें नाहीं. 'जगायचें असेल तर पैसे हे जवळ पाहिजेतच' हा महामंत्र मी चांगला शिकलों होतों. अनुभवानें मला कामचोरी करून जास्त मिळवायची कला साधली. पण लढाई बंद झाली तसें कामच मिळेना. शेवटीं रिक्शा चालवायचें ठरविलें.

नारायणसिंग नांवाच्या एका इसमांकडून रिक्शा घेतली. रोज त्याला दीड रुपया द्यायचा. शिवाय मोडतोड दुरुस्त करायची. दिवसभर फिरून दीड रुपया कसा तरी पदरांत पडायचा. फॅशनेबल स्त्रीपुरुष झकपक कपडे घालून व सुगंधी उटणी लावून रिक्शांत बसले म्हणजे मला वाटायचें:–

'काय हें आपले जगणें ! नाहीतर हीं माणसें–कशी हेवा करण्यासारखीं आहेत ! घ्यावेत त्यांचे कपडे, अलंकार लुटून; नागवावे त्यांना-पण शहाजोगपणें हें करतां आलें पाहिजे. तरच जमेल पैसा आणि जगणें सोपें होईल.' त्यांचे परस्परांतील नातें कधीं कधीं. अप्रीतीचें, सक्तीचें भीतीचे, अनीतीचें, अविश्वासाचें असें. पण ती त्या अरुंद

सुपलीत दाटून बसत. कोर्टाला, शाळेला, स्टेशनला, दवाखान्याला, सिनेमाला, प्रदर्शनाला, समारंभाला आणि स्मशानाला लोकांना पोंच-वावे लागे. पण मला आपलें वाटायचें:— कां या धांवपळीला आपण घाम गाळून मदत करायची, केवळ जगायचय् म्हणून !

नारायणसिंगाच्या आरंभी सहाच रिक्शा होत्या. पण ती संख्या भराभर वाढूं लागली. मला शंका आली म्हणून मी पाळत ठेवली. बरेंच दिवसांनीं मला सारा भेद कळला. धागेदोरे, खाणाखुणा सर्व पुरावा हातीं लागला. चोरीच्या सायकलींचे तुकडे जोडून तो रिक्शा बनवी. या चोरधंद्यांत त्याला भरपूर प्राप्ती होई आणि वर दहावीस लोक पोसले जात. त्याला तुरुंगाचे भय घालून मी त्यांत भागीदारी मिळविली आणि बेगुमान, बेदरकार आणि बेछूट जीवन जगूं लागलों. आणि तेहि प्रतिष्ठितपणानें. याच भांडवलांतून पुढें आपल्या नांवानें परदेशाहून सायकली आयात करणारी फर्म काढली. 'डी नारायणसिंग' या रिक्शा बनविणाऱ्या कंपनीला माझ्या नांवचे आद्याक्षर आणि 'एन् दुर्वासुलु' या सायकलीचा व्यापार कर-णाऱ्या फर्ममध्यें त्याच्या नांवाचे आद्याक्षर. कांहीं दिवसांनीं भांडण करून वाटणींत दोन कारभार दोघांच्या स्वतंत्र मालकीचे वेगळे केले. चोरीच्या सायकली कुठून येतात याचा सुगावा पोलिसांना देऊन नारा-यणसिंगाचा धंदा बुडविला. नव्या सायकलींचे सुटे भाग त्याला महाग विकून चिकाटीनें धंदा चालवायला लावले, आणि सपशेल बुडविलें. दिवाळें काढून आणि अनेक लोकांना फसवून नारायणसिंग फरारी झाला.

'एन् दुर्वासुलु' या फर्मचा व्याप कांहीं लाखांचा झाला, त्याच्या मालकाच्या मोटारी आणि बंगले झाले. त्याच्या भोंवती आप्तेष्टांचा घोळका जमला. त्यानें विविध प्रकारच्या, जातीच्या, व पातळीच्या स्त्रियांच्या सतित्वाचा स्वाहाकार आपल्या पांढरपेशा पशुत्वाखालीं केला.

पण तो मुन्नीला, त्या तरुण भिकारणीला विसरूं शकला नाहीं. ती पुन्हा भेटावी म्हणून सारखा भिरभीर शोधत राहिला. ऐषआरामांतहि अस्वस्थ राहिला, अतृप्त राहिला.

आणि गेल्या आठवड्यांत ती माझी मनीषा अचानक सफल झाली. त्याच जंक्शनवर पहिल्या वर्गाच्या वेटिंगरूममध्यें मी बसलों असतांना, मुन्नी मला समोरून जातांना दिसली. धांवतच मी तिच्या जवळ गेलों. तिनें मला ओळखलें नाहीं. भारी रेशमी सूटमध्यें मी होतों. सुखवस्तूपणानें माजलेला !

तीहि अगदीं बदलून गेली होती. तिचा तो उंडारलेला टणकपणा राहिला नव्हता. काळवंडली होती ती. तींच लक्तरें; तोच चेहऱ्याचा लाचारपणा; चार वर्षांच्या एका उघड्यानागड्या मुलीला हाताशी धरून ती चालली होती.

'मुन्नी, मला तू ओळखलं नाहींस?' नाहीं, मुळीच नाहीं, ती नुसते पहातच राहिली.

'मी दुर्वास—तुझे नऊलाख देणें लागतो.'

'कोण? दुर्वास? तो गुत्तेदाराकडे कामाला गेलेला—नाहीं?'

'होय; तोच मी. ही तुझी मुलगी का?'

'होय माझीच.'

मी तिला वेटिंग रूममध्यें नेले. मुलीसाठीं खायला आणवलें. म्हटलें—'मी तुला सारखा शोधीत होतो. कुठं होतीस?'

'याच जगांत, माझ्या जगांत.'

तिच्या जीवनांत कांहींहि बदल झाला नव्हता. मुलीचा बाप कोण हें तिला सांगणें शक्य नव्हतें. 'तीन मुलं झाली पण एवढी पोर वांचली' असें तिनें सांगितलें. 'गुत्तेदाराकडे कामावर असतांना तू माझा संग ठेवावा म्हणून आलास पण मी तुला टाळलें आणि चकविलें.' असें तिनें कबूल केलें.

मला पाहून तिला आनंद झाला हें उघड होतें. 'मी खूप श्रीमंत झालों' असें सांगितले तेव्हां तिच्या डोळयाला पाणी आलें.

'मुलंबाळं काय आहेत?' तिनें विचारले. मी लग्न केले नाहीं असे सांगतांच तिनें तीव्र नापसंती दर्शविली. जास्त वेळ बोलत बसणेंहि शक्य नव्हते. तिच्या माझ्या दर्जांत साता समुद्राचे अंतर पडले होते.

'माझ्याबरोबर चल, मी तुला नि तुझ्या लेकीला सांभाळतो– सुखात ठेवतो.'

'नाहीं. मला सर्व लोक ओळखतात. तुझ्याजवळ राहिले तर तुझी इज्जत जाईल. नाहीं, तुझं माझं जग वेगवेगळं आहे. मुलगी तुझी असती तर आनंदानें तुला दिली असती. माझी मलाच सांभाळली पाहिजे.'

माझी फार निराशा झाली मी तिला म्हटलेः–

'तुला माझ्याबद्दल कांहींच जिव्हाळा कसा वाटत नाहीं? माझी इच्छा, स्वतःचे सुख, लेकीचे भाविष्य, कांहींच कसे तूं विचारांत घेत नाहींस? कुठें तुझे मन गुंतले आहे!'

'काय वाटतें तें कसें सांगू? कांहीं वाटत नसते तर तुझ्यासाठीं जीवाचे रान केले असते का? आपल्या जगांत जाऊन तूं सुखी व्हावेस म्हणून आपला देह विकून तुला–ऽऽ–देव मानले तुला!' अत्यंत गहिवरानें ती म्हणालीः–

'विटाळणार नाहीं तुला! कधींहि नाहीं!–कुठें गुंतणार मन? माणसाला ते असते. जनावरासारखे जगण्यांत कुठले आले मन?'

मी आपला हट्ट सोडला नाहीं. आणि तिनेंहि ऐकले नाहीं. म्हणालीः– 'वेडा आहेस. सुग्रास जेवावं, बंगल्यांत रहावं, मोटारींत फिरावं हे कुणाला नको असतं? पण मला माहीत आहे. मला जवळ घेऊन तूं सुखी होणार नाहींस–जगणार नाहींस. जगायचय् ना तुला?

का कंटाळलास ?'

'तूं आली नाहींस तर कंटाळेन.'

'खरं नाहीं हे. मुळींच खरं नाहीं. स्वतःला फसवूं नको. मला ऐष आरामांत पहावी म्हणून म्हणतो आहेस. मला विसरून गेलास तरच तूं सुखी होशील.'

'मग आपले कर्ज तरी फेडून घे.' मी शेवटीं कडवटपणें म्हटलें.

'कसले ?'

'मला नऊ रुपये दिले होतेस. व्याजासुद्धां नऊ लाख—'

'कर्ज नव्हते ते.—जीवन होते. तुझ्या जगांत पैसा हेच जविन आहे. स्वतःला विकून तुला ते हवे होते तेव्हां मी दिले. समुद्रकाठीं चुळकाभर अर्घे द्यावे तसे.—पाण्यांत पाणी मिसळून गेले. देणेघेणे कांहीं नाहीं.'

'कांहीं खाऊन तरी जा; एखादा कपडा आठवण म्हणून घेऊन तरी जा.' असे विनविले तेव्हां ती म्हणाली:—

'या पहिल्या वर्गाच्या वेटिंगरूममध्यें असे मी अनेक वेळां केले आहे. पोटभर खावे, भोग द्यावा, आठवण म्हणून एखादे पांघरूण घेऊन जावे.' हें म्हणतांना तिचे अंग थरथरत होते. भावनावेगानें ती नुसती गदगदत होती. बराच वेळ कांहीं बोलली नाहीं. मग लगेंच झोंपी गेलेल्या मुलीला उचलून तिनें खांद्यावर टाकले आणि जड पावलांनीं ती निघून गेली.

अजूनहि माझें मन अस्वस्थ, अतृप्त, असुखी असे भिरभिरते आहे. ओळखीची झालेली पण न लाभलेलीं सुखें—त्यांचा विसर कांहीं केल्या पडत नाहीं.—जगायचय् मला ! कारण जगणे अपुरे राहिले आहे मनासारखे जगणे झालेच नाहीं.—

———